# प्रस्तावना



**'अविवाहितांचे प्रश्न'** या पुस्तकांत अविवाहित लोकांच्या अनेक प्रश्नांची चर्चा केलेली आहे. खुद्द अविवाहितांना पडणारे प्रश्नच काय, परंतु अविवाहित स्त्री-पुरुषांनीं समाजापुढें उभे केलेले प्रश्न स्पष्टपणें मांडून ते सोडविण्याचा प्रयत्न केलेला आढळेल. आज पांढरपेशा समाजाची वैवाहिक उपासमार आणि वाताहत, ह्या इतक्या तीव्रतेनें आणि झपाट्यानें होत आहेत, कीं त्याकडे डोळेझाक करणें आतां अक्षम्यच ठरेल. कोणत्याहि समाजांत आणि केव्हांहि अविवाहितांची संख्या वाढत जावी, हें कांहीं सुचिन्ह नव्हे. समाजस्थैर्य, नीतिमत्ता, वंशवृद्धि, परंपरेची जपणूक, संस्कारांचें सातत्य, ह्या सर्व राष्ट्रीय महत्त्वाच्या बाबती लग्नसंबंधांतून निर्माण होत असतात, पोसल्या जात असतात; यासाठीं ह्या प्रश्नांकडे जास्त चिकित्सक अशा सहानुभूतीच्या परंतु निकडीच्या दृष्टीनें पाहणें जरूर असतें. निदान अविवाहित राहण्याची प्रथा कांहींशी आर्थिक अडचणीमुळें, तर कांहींशी खोट्या धास्तीमुळें पांढरपेशा समाजांत वाढत आहे, तिचें वैय्यर्थ्य समाजापुढें कुणी तरी मांडलेंच पाहिजे. लग्न करणें न करणें हा निखालस ज्या त्या व्यक्तीचा ऐच्छिक प्रश्न म्हटला, तरी जेव्हां लग्नसंस्थेवर बहिष्कार घालणाऱ्यांचीच संख्या अधिकाधिक वाढत जाते, त्या वेळीं ही वैयक्तिक बाब सार्वजनिक धोक्याची एकदम होते, अविवाहित राहण्याच्या वाढत्या प्रवृत्तीची उपेक्षा करणें धोक्याचें होऊं लागतें. खुद्द व्यक्तिमात्राचे विचार हेहि एककल्ली, एकदेशी वा अनिश्चित असे असूं शकतात, आणि पांढरपेशा समाजांतच लग्न न करण्याची जी प्रवृत्ति दिसून येते तिच्या बुडाशीं तरी हीच भित्री, एककल्ली विचारसरणी असते. त्या विचारसरणीची छाननी केली तरच त्यांतील खऱ्या-खोट्यांची पारख होणार आहे, त्यांना दिसणाऱ्या अडचणी दूर होणार आहेत.

**'अविवाहितांचा शाप'**, या लेखांत काल्पनिक अडचणींच्या भेवडावणीनें अविवाहित राहणाऱ्या आजच्या तरुणमंडळीच्या चुकीच्या तर्ककुतर्कांची चर्चा केली आहे, तर लग्नसंस्थेवर बहिष्कार टाकण्यास प्रवृत्त करणाऱ्या स्वैराचाराची छाननी आधुनिक शास्त्र सिद्धान्ताच्या कसोट्यांवर करतां तो कसा त्याज्य आहे, याची शास्त्रीय चर्चा **'स्वैराचाराची छाननी'** यांत सापडेल. हौसेनें अगर

जरूरीनें उच्च शिक्षण घेतलेल्या पण कष्टी होणाऱ्या प्रौढ कुमारिकांच्या अडचणी **'सुशिक्षित कुमारिकांच्या प्रश्नानें'** पुढें मांडल्या आहेत. अविवाहित मातृ-पदाचा यमलोक व त्यांतून दुःखितांना सोडविण्याचे मार्ग कोणते व समाजानें अशा दुर्दैवी मातांच्या बाबतींत जरूर तें कोणतें धोरण ठेवावयाचें, याचें दिग्दर्शन **'अविवाहित माता'** या लेखांत सापडेल. पुनर्विवाहाच्या चळवळीची व्यावहारिक दृष्टीनें चर्चा करून कळकळीनें त्याची तरफदारी **'एक उपेक्षित सुधारणा'** या लेखांत केलेली आहे. विवाहेच्छु तरुण स्त्री-पुरुषांची होणारी कुचंबणा **वर्णन** करणाऱ्या **'कुजलेला डाव'** या लेखानें ती कुचंबणा दूर करण्याचे उपायहि सुचविले आहेत. सांप्रत सर्वत्र वर्णन होत असलेला प्रीति-विवाह किती दुर्मिळ आहे आणि तो आदर्श विवाहप्रकार का घडून येत नाहीं व कसा घडून येईल, याचें विवेचन **'प्रीतिविवाह'** ह्या लेखांत आढळेल, तर प्रणयोपासना करणाऱ्या तरुण-तरुणींच्या पायांखालीं दडलेले सुरुंग कोणते तें, व ते कसे टाळावेत हें, **'नंदनवनांतील खांचखळगे'** हा लेख दाखवील. **'मीं कोणता वर पसंत करावा?'** आणि **'मीं कोणत्या मुलीशीं लग्न करावें?'** ह्या दोन्ही लेखांत वधूवरपसंतीच्या बाबतींत नवीन पण हितपरिणामी सिद्धान्त नमूद केलेले आहेत. लग्नानंतर नवीन जबाबदाऱ्या उत्पन्न होतात, तेव्हां स्वभावांचें संपूर्ण मीलन होण्यासाठीं कोणकोणती तयारी विवाहोत्सुकांनीं करावी, हें **'सुरेल स्वभाव'** या लेखांत वर्णिलें आहे. एकीच्या हयातींत दुसरी बायको करण्याच्या वाढत्या प्रथेचें **'शिकलेली सवत'** व **'पुरुषास बिघडविणारी कोण? घरची कीं दारची?'** या दोन लेखांत वर्णन केलेलें मानसशास्त्र विवाहोत्सुक तरुणींनीं अवश्य ध्यानांत ठेवल्यास विवाहितांच्या नंदनवनांत डोकावणाऱ्या ह्या काळसर्पाला त्यांना दूर लोटतां येईल.

**'अविवाहितांचे प्रश्न'** आणि **'विवाहितांचें नंदनवन'** या माझ्या दोन पुस्तकांमिळून 'स्त्री-पुरुष-संसारविषयक' सर्व आधुनिक प्रश्नांची अद्यावत् चर्चा पुरी होईल. पुढें-मागें हीं दोन्ही पुस्तकें एकत्र करून 'नेटका संसार' या नांवानें कुणी प्रसिद्ध केल्यास, तें पुस्तक संसारशास्त्रावरील माझे विचार पूर्णत्वानें प्रकट करणारें होईल.

मु. पुणें,
ता. ७-१-१९४०.

**वा. वि. जोशी**

# अनुक्रम







# राजरत्न जोशी यांचीं पुस्तकें

## कादंबऱ्या

१ कठीण कसोटी ( मिश्रविवाह )

२ जन्माचा बंदिवास ( घटस्फोट )

३ पराधीन ( स्त्रियांची आर्थिक परवशता )

४ ओघळलेलें मोतीं ( अनौरस संतति; पुनर्विवाह )

५ न सुटलेलें कोडें ! ( लैंगिक )

६ दुराचारी ( देशभक्ताचें द्विविध-दर्शन ) छापत आहे.

७ अंतर ( विजोड ) तयारींत.

## विनोदी

८ रेशमी चिमटे

९ नरम-गरम

## संसारविषयक

१० विवाहितांचे नंदनवन

११ अविवाहितांचे प्रश्न

## कायदा सुधारणा

१२ स्त्रियांचे हक्क व सुधारणा

१३ **Women's Legal Disabilities**

१४ **Property Rights of Women**

# अविवाहितांचा शाप : : १

एखादी जरूरीची गोष्ट लांबणीवर टाकावयाची सवय झाली, कीं तिची जरूरीच पुढेंपुढें वाटेनाशी होते. अशीच स्थिति लग्नसंस्थेची झाली आहे. समाजधारणेस लग्नसंस्था ही अवश्य आहे, असें धर्मशास्त्र आजवर प्रतिपादन करीत आलें. व्यक्तीच्या स्वास्थ्यास लग्न करणें हें अत्यंत आवश्यक आहे, असें परंपरा आणि सांसारिक अडचणी आपापल्यापरी सांगत आल्या. विषय-सुखाची लालसा स्वतःच्या तृप्तीसाठीं एकट्या लग्नसंस्थेकडेच चातकाच्या आतुरतेनें पाहत आली. आणि या सर्वांनीं मिळून लग्नसंस्कार हा दरेक व्यक्तीला अवश्यमेव ठरवून लग्नसंस्थेस मजबूत केलें. अनंत जरूरींची आगाऊ तरतूद करण्याच्या घिसाडघाईनें, हा संस्कार अगदीं बाल्पणींहि उरकण्याचा समाजानें जो वेडेपणा दाखविला त्याची प्रतिक्रिया, प्रौढ, अतिप्रौढ विवाहाच्या उत्तरोत्तर पायऱ्या गाठीत 'लग्नच नको' या शेवटच्या पायरीकडे धूम ठोकत आहे.

बालविवाहाच्या बरोबर पुनर्विवाहाची राजमान्य रूढि आणि घटस्फोटाची सरसहा सवलत ह्या जर प्रचलित असत्या, तर बालविवाहाच्याविरुद्ध इतकें

लोकमत तयार झालें नसतें, दृढ झालें नसतें. आजहि सदृढ आणि सशक्त दिसणारी मध्यम वयाची पिढी, बालविवाहावर प्रजाऱ्हासाचा लादण्यांत येणारा आरोप खोटा ठरवीत आहे. कांहींहि असो, पण दिवसेंदिवस तरुण पिढी अधिकाधिक अविवाहित राहूं लागली आहे आणि मुळींच लग्न नको अशा निश्चयावर येऊन ठेपणाऱ्यांची संख्याहि सारखी वाढत आहे. हा प्रकार व्यक्तीच्या आणि समाजाच्या दृष्टीनें अनिवार्य आहे कीं काय आणि तो स्त्री-पुरुषांच्या दृष्टीनें इष्ट आहे कीं अनिष्ट आहे, याचें विवेचन येथें करण्याचें योजिलें आहे.

आर्थिक ओढाताणीनें जे आपले सात्त्विक आणि जिव्हाळ्याचे आनंद आपणांस महाग केले, त्यांतच कुटुंबसुख हें होय. आजच्या प्रौढविवाहालाच काय, पण लग्न न करण्याच्या निश्चयालाहि पैशाची ओढाताणच विशेष रीतीनें जबाबदार आहे. स्त्री-पुरुषांना एकमेकांच्या सहवाससुखाची, विषयसुखाची, मैत्रीची, मदतीची इच्छा व आतुरता वाटत नसेल असें थोडेंच आहे ? जीवन-कलहाच्या हुल्लडींत तरुण इतका गुदमरून आणि गोंधळून जातो, कीं त्याला त्याच्या या नैसर्गिक लालसांना मनांत दाबून ठेवावें लागतें. इतकेंच नव्हे तर, या लढाईत आपल्यामुळें दुसऱ्या कोणास तोशीस पोंचूं नये म्हणून त्या व्यक्तीस नवीन नात्याच्या निमित्तानें तो आपल्याबरोबर संकटांत खेचूं इच्छीत नाहीं. आईबापांच्या जिवावर जगणाऱ्या शरमिंद्या मुलाच्या बायकोला त्यांच्याकडून होणारा जाच, हाच पहिल्यानें शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या शिकलेल्या मुलांना 'कमवूं लागल्याशिवाय लग्न करणार नाहीं' अशा निश्चयाचा बेलभंडारा उचलवयास लावूं लागला. उच्च शिक्षणाचा वाढता खर्च पुरा पाडतांना वडील मंडळींची इतकी धांदल उडूं लागली, कीं पुष्कळ वेळा त्यांना स्वतःच्या पोटालाहि चिमटा घ्यावा लागे. अशा स्थितींत लग्नानिमित्त घरांत येणाऱ्या नवीन सुनेच्या पोषणाचा खर्च त्यांना झेपेनासा झाला. त्यांच्या हौसेला, कर्तव्याला एकदम आळा बसला.

मुलींना येणारें वैधव्य आणि त्यानंतर त्यांची होणारी उपासमार टाळण्या-साठीं आगाऊ तरतूद म्हणून, उपजीविकेचें साधन हस्तगत करतां येईल इतकें शिक्षण देण्याची दरेक मुलीचा बाप आपल्याकडून शिकस्त करीत आहे. स्वतः

मुलगा आज सुशिक्षित बेकार होऊन आपल्या पित्याच्या पश्चात्तापाचा व बहुजनसमाजाच्या तिरस्काराचा विषय होऊन राहिला आहे. तो स्वतःच्या एकट्या पोटाला महाग झालेला, तेव्हां लग्न करून एकाचीं दोन पोटें करून उपासमारीच्या खाईंत भर टाकण्यास तो तयार कसा असेल? मुलगे लग्न करीत नाहींत म्हणजे मुली अविवाहित राहणारच. ज्या मुलींनीं उपजीविकेची विद्या हस्तगत केली असेल, अशा मुली आपण होऊन लग्नाच्या निमित्तानें स्वतःचें स्वातंत्र्य गमावण्यास तयार होत नाहींत. कमावत्या कुमारिकेचे आई-बाप व नातेवाईक तिच्याकडून होणाऱ्या आर्थिक मदतीवर अवलंबून राहूं लागतात. तिचे पालक तिच्या लग्नाबद्दल उदासीनच काय, पण विरुद्धहि असतात. तिच्या शिक्षणासाठीं केलेल्या खर्चाच्या मोबदल्यांत आजन्म आर्थिक मदत मिळत राहिली पाहिजे असा हक्कहि ते सांगूं लागतात. ज्या तरुणांना नोकरीचाकरी लागते, कामधंदा मिळतो, त्यांचीहि प्राप्ति त्यांच्या गरजांच्या मानानें इतकी तटपुंजी असते, कीं लग्न करण्याचा विचारहि कर-ण्यास त्यांचें मन धजत नाहीं. बालविवाहावरून प्रौढविवाहावर आणि प्रौढ-विवाहावरून आजन्म कौमार्यावर पांढरपेशा समाज जो एकसारखा घरंगळत चालत आहे, त्याला आर्थिक ओढाताण हेंच एकच्या एक खरें कारण आहे.

धार्मिक भोळ्या समजुतींच्या उच्चाटनाबरोबर संस्कारांचें अधिष्ठान आणि महत्त्व नाहींसें होत गेलें. सोळा संस्कार प्रत्येक व्यक्तिमात्राच्या आयुष्यांत झालेच पाहिजेत, अशा समजुतीनें जुने लोक लुले, पांगळे, रोगी अशा सर्व माणसांचीं लग्नें हजार खटपटी-लटपटींनीं उरकून घेत असत. ती धार्मिक भावना नाहींशीं झाल्यानें संस्कार म्हणून अवश्यमेव घडून येणाऱ्या लग्नांची संख्या एकदम नाहींशी झाली. मनुष्यमात्राची चहापाण्याची, जेवणा-खाण्याची आणि राहण्याची सोय दुकानें आणि खाणावळी यांच्यांत होऊं लागल्यापासून घर मांडण्याची जरूरी व महत्त्व एकदम नाहींसें झालें. आणि हें घर मांडणें म्हणजे लग्न करणें ही जी एक अवश्य अशी कार्यकारणघटना लग्नसंस्थेची आजवर पाठीराखी होती, ती नाहींशी झाली. खाण्यापिण्याची अडचण दूर करण्यासाठीं लग्न करणें अत्यावश्यक झाल्याचीं उदाहरणें नाहींशीं होत चाललीं.

कुटुंबें आर्थिक ओढाताणीनें फटाफट फुटून वेगळीं होऊं लागलीं. दरेक व्यक्तीनें आपापल्या पोटाचीच फिकीर बाळगावी असा प्रकार वाढत चालला. त्यासरशीं कौटुंबिक परंपरेचीच काय, पण कौटुंबिक सुखी जीवनाची तोंड-ओळखहि लोकांना होईनाशी झाली. कुटुंबसंस्था वा कौटुंबिक परंपरा चालविण्यासाठीं लग्नाचें महत्त्व वाटेनासें झालें. अभ्यासासाठीं व नोकरीचाकरीसाठीं दीर्घ कालपर्यंत एकटे राहणारे, एकलकोंड्या जीवनाला चटावलेले अविवाहित स्त्री-पुरुष, विवाहित जीवनालाच विशेष भिऊं लागतात. अतिप्रौढावस्थेपर्यंत अविवाहित राहणें हें वैषयिक प्रवृत्तींना हां-हां म्हणतां वठवून टाकतें आणि जे स्त्री-पुरुष नेकीनें वा नीतिमान् राहत नाहींत, त्यांना लग्नाची मातब्बरी ती काय वाटणार! आणि त्यांना वैवाहिक पवित्र सुखाची कल्पना ती काय असणार?

अविवाहित राहणारी मंडळी तसें पाहिलें तर एका दृष्टीनें पुरी आपमतलबीच! बरेचसे लोक केवळ आपल्या एकट्याच्या चैनींत कमतरता येईल या सबबीवर लग्न करण्याचा विचार डोक्यांत येऊं देत नाहींत. अप्सरांच्या पाठीमागें लागलेले तरुण, आणि आय्. सी. एस्.साठीं धाय मोकलणाऱ्या तरुणी, कालांतरानें लग्नाच्या बाजारांत टाकाऊ ठरून अडगळी मालांत जाऊन पडूं लागतात. त्यांना कोणी मागणी घालणाराच राहत नाहीं. त्यांनीं आपल्या भरमसाट महत्त्वाकांक्षा पार सोडून दिल्या तरीहि त्यांच्याकडे कोणी पाहण्यास तयार नसतें. पदवीधर व कमावत्या कुमारिकांना लग्नाच्या बाजारांतून जणूं कोणीं कायमचें उठवूनच लाविलें आहे, अशा तऱ्हेनें पुन्हा, त्यांचा मागमूसहि लागेनासा होतो. एवंच, अनेक कारणांनीं लग्नसंस्थेवरील लोकांचा आधार आणि विश्वास आपोआप उडत चालला आहे. लग्न जमणें, होणें व नांदणें या गोष्टीहि इतक्या जिकिरीच्या आणि अपेशी परिणामांच्या होऊं लागल्या आहेत, कीं लांबून पाहणारांसहि लग्नाबद्दल दहशतच बसावी.

अशा प्रकारें लग्न न करण्याबद्दलच्या चळवळीस अनुकूल अशी परिस्थिति सर्व बाजूंनीं निर्माण झालेली दिसते. तथापि लग्नाशिवाय राहणें हें स्वतः व्यक्तिमात्राला व समाजाला कितपत हितावह होईल याचाहि आपण विचार केला पाहिजे.

स्त्री-पुरुष-आकर्षण हें अगदीं गुरुत्वाकर्षणाच्या नियमाइतकें निसर्गसिद्ध असून अनिवार्यहि असतें. अगदीं लहानपणापासून समवयस्क विजातीयांचाच एकमेकांकडे ओढा असतो. एकमेकांचा स्नेह संपादण्यासाठीं दोघांनाहि सारखीच उत्सुकता असते. ही विजातीयांच्यांतील आकर्षणशक्ति वयोमानाबरोबर एकसारखी वाढत जाते. विशेषतः शरीररचनेच्या ठिकाणीं पेरून ठेवलेल्या वैषयिक आकांक्षेचें बीज जों जों मूळ धरूं लागतें, तों तों विजातीयांच्या स्नेहाबद्दलची आतुरता अगदीं बेफामपणें वाढूं लागतें, ती इतकी, कीं प्राणिमात्रास स्वतःचें एकलकोंडें जीवन हें अपुरें व अर्धवट वाटूं लागतें. व्यक्तिमत्त्वाच्या वाढीसाठीं सजातीय स्नेह्यां-सोबत्यांपेक्षां विजातीय मित्र-मैत्रिणींचीच ज्याला त्याला जरूरी भासूं लागते. याच त्या मुसमुसणाऱ्या तारुण्याच्या काळांत तरुण जिवलग मित्रांना सोडून मैत्रिणी हुडकावयास लागतो. जिवाभावाच्या मैत्रिणीला चुकवून तरुणी एखाद्या मित्राची आराधना करूं लागते. वैषयिक आकर्षण हें अनेक प्रकारचें असतें आणि तें अनेक प्रकारांनीं साधावयाचें असतें. पंचेंद्रियांच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या संवेदना व पंचेंद्रियांच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या आकांक्षा, यांची परिपूर्ति तर साधावयाची असतेच; शिवाय कल्पना, भावना, बुद्धि, ज्ञानेंद्रियात्मक सर्व मानसिक व्यापारांमुळें उत्पन्न होणाऱ्या आकांक्षा, आणि बौद्धिक समाधान, हींहि साधावयाचीं असतात.

या वैषयिक भावना कधीं कधीं अत्यंत विशुद्ध व त्यांचे विषयहि तितकेच पवित्र आढळून येतात. अल्पवयी तरुणाच्या मनांत एखाद्या पोक्त बाईबद्दल निर्व्याज प्रेम उत्पन्न होणें, तिच्याजवळ आपलें मन मोकळें करून बोलून दाखवण्याची त्याला इच्छा होणें आणि तिनेंच आपणांस सल्लामसलत द्यावी अशी अपेक्षा त्यानें करणें हेंहि वैषयिक आकर्षणाचे आणि परिपूर्तीचे उच्च कोटींतील प्रकार होत एवढेंच. ती पोक्त बाईसुद्धां तिला पोर शोभणाऱ्या तरुणाबरोबर आस्थेवाईक प्रेमळपणानें वागेल, त्याच्या विश्वासाचें स्थान होण्याची महत्त्वाकांक्षा धरील, त्याच्या बालिश विचारांचें आणि उमद्या शरीराचें कोडकौतुक करील, फार काय, पण त्याच्या भावी भार्येचें सर्व निरनिराळ्या रंगांनीं आणि छटांनीं परिपूर्ण असें आदर्श चित्र रेखाटील, हा प्रकारहि पवित्र वैषयिक प्रेमाचाच होय. हें प्रेम वैषयिकच कां समजावयाचें ह्याचें दुसरें एक गमक आहे.

मुलगा आईशीं अगर बहिणीशीं आणि मुलगी भावाशीं अगर वडिलांशीं एकदम मनमोकळेपणानें बोलण्याची बंद होते. वैवाहिक म्हणजे दूरान्वयानें वैषयिक बाबतींची चर्चा ती व्यक्ति अशाच दुसऱ्या व्यक्तीजवळ करते, कीं जिच्यांत दुसऱ्या पवित्र आणि नजीक अशा नात्यागोत्यांची सरभेसळ नसेल. या सर्व वैषयिक आकांक्षांचाच काय, पण यशस्वी परिपूर्तीचा परमोत्कर्ष विवाहांत होतो. या उत्कर्षास आजन्म शाश्वति विवाहसंस्थेमुळें लाभते.

आर्थिक परिस्थितिहि विवाह करण्याच्या विचारांची एकसारखी गळचेपी करीतच आहे. कांहीं एका किमान मर्यादेच्या खालीं ज्यांची प्राप्ति असेल अशांनीं लग्न न करणें हें उचितच आहे; पण अशा व्यक्तींची संख्या मात्र फारशी नसते. सर्वसाधारणपणें असें म्हणतां येईल, कीं लग्न हें सर्वांच्या आटोक्यांत असतें. आर्थिक अडचणींची जितकी आपल्यास भीति वाटते तितकी ती प्रत्यक्ष जाचक होतहि नाहीं. उलट आर्थिक दृष्टीनें वैवाहिक आयुष्य हें पुष्कळ प्रकारें कमी खर्चाचें आणि अधिक सुखाचें ठरतें. वीसपंचवीस रुपये दरमहा मिळविणाऱ्यालाहि स्वतंत्र भाड्याची खोली ठेवावी लागते, दुकानांतला चहा आणि खाणावळींतलें जेवण घ्यावें लागतें. एवढ्याच खर्चात नवराबायकोचा गरिबीचा संसार होऊं शकेल आणि घरकामास त्याला नोकर-चाकर ठेवण्याची जरूर पडणार नाहीं हें निरालेंच.

आर्थिक अडचणींमुळें लग्न न करण्याचे विचार पुरुषालाच नाउमेद करीत असतात. संसाराची आर्थिक जबाबदारी पुरुषावरच आणि म्हणून पुरुषाचेंच उदाहरण घेतलें. बायको फार महाग पडेल अशी पुरुषांनीं विनाकारण आपली कल्पना करून घेतलेली असते. बायकोलाहि एकत्र संसार करावयाचा असतो; तेव्हां तीहि शक्य तितक्या काटकसरीनेंच राहणारी असते. परंतु स्त्रीच्या स्वार्थत्यागी मनोवृत्तीची, सोशिकपणाची, काबाडकष्टी प्रवृत्तींची पुरुषांना ओळखसुद्धां नसते हेंच खरें! आतां एवढें खरें, कीं एकट्याचा जसा ऐष-आराम चालेल, तसा तो दोघांचा मिळून चालावयाचा नाहीं. पण सिनेमा, गाडी, ट्रॅम, हॉटेलें, सिगोरेट्स, ड्रिंक्स इत्यादि कोरड्या ऐषआरामांच्या मानानें विवाहित स्त्री-पुरुषांना मनमुराद मिळणारें अनेक प्रकारचें सुख किती तरी पटींनीं अधिक आनंददायक आणि किंमती असतें. सर्व जगच आर्थिक अडचणींच्या वालुका-

प्रदेशांत सापडलें आहे. व्यक्तिमात्रांनाच काय, पण मोठमोठ्या राष्ट्रांना ह्या आर्थिक अडचणींची झळ लागून तीं भराभर मूर्च्छित होत आहेत. यांत्रिकं युगानें माणसांच्या गरजा वाढवून त्या पुऱ्या करण्याचीं साधनें बेसुमार वाढवलीं खरीं; पण त्या सुखसाधनांची प्रत्येक व्यक्तिमात्राला प्रत्यक्ष अगर परोक्ष जिवापाड किंमत द्यावी लागत असल्यानें खऱ्या समाधानास आपण अधिकाधिकच पारखे होत चाललों आहोंत.

ही स्थिति वाढतच जाणार, तेव्हां आर्थिक अडचण दूर झाली म्हणजे सावकाशीनें लग्न करूं असा विचार कोणी डोक्यांत आणला, तर तो आचारांत उतरण्यासारखी अनुकूल परिस्थिति कधींच प्राप्त व्हावयाची नाहीं. संततिनियमनाच्या यशस्वी उपायांनीं मुलांबाळांचा विस्तार आटोक्यांत ठेवतां येतो; यामुळें एका दृष्टीनें लग्न करून संसार करणें हें बरेंच आटोक्यांतलें, आटपसर आणि अंदाजपत्रकास झेपेल असें झालें आहे. आर्थिक अडचणी पूर्वींच्या लोकांपुढें नसत असें थोडेंच आहे ! पतिपत्नींचीं सुरुवातीचीं कांहीं वर्षें पैशाच्या ओढाताणींत आणि वेळीं हलाखीच्या स्थितींत जातात. तारुण्याच्या पहिल्या बेगुमान कारकीर्दीत त्याचें फारसें वाटत नाहीं. तरुणपणीं माणसाचें मन ऐषआरामापेक्षां शारीरिक सुखोपभोगांकडेच जास्त झुकलेलें असतें आणि तें यथेच्छ मिळत असतील तोंवर त्याला इतर हालअपेष्टांचें कांहींच वाटत नाहीं. पूर्वींच्या काळीं नवीन लग्न झालेल्या मुलांचें पालनपोषण पालक करीत; फार काय, पण निराळ्या ठिकाणीं राहणाऱ्या मुलाला ते आर्थिक मदतहि करीत असत. काटकसरीनें संसार करण्याची विद्या ज्यानें हस्तगत केली असेल त्याला या आर्थिक अडचणींचा फारसा बाऊ वाटावयाचा नाहीं. उभयतांनींहि अंगमेहनतीनें संसाराचीं कामें जातीनें करावयाचीं असा बाणा बाळगला तर वैवाहिक जीवन हेंच शेवटीं कमी खर्चाचें आणि अधिक सुखाचें ठरेल.

वैषयिक इच्छा उत्पन्न होणें, ती तृप्त होण्यासाठीं आतुरता लागणें, तिची तृप्ति होतांच समाधान होणें, ह्या गोष्टी अगदीं प्रत्येक प्राणिमात्राला आवश्यक आणि अनिवार्य प्रकारें निसर्गानें चिकटवून दिलेल्या आहेत. त्यांची परिपूर्ति करणें हें कोणत्याहि तऱ्हेनें जगन्निर्मित्या परमेश्वराच्या संकेताविरुद्ध नाहीं. माणसाला शिंगें, मोठालीं नखें हीं आवश्यक नव्हतीं म्हणून परमश्वरानें मनुष्यप्राण्यांपासून तीं हिरावून घेतलीं आहेत. अनावश्यक अगर घातुक अशा

गोष्टी निसर्ग नेहमींच प्राणिमात्रांच्या राशींतून वेंचून काढून टाकीत असतो. वैषयिक भावना त्यानेंच निर्माण केली. ती जर निंद्य अगर घातुक असती तर तिचें उच्चाटन आपोआप झालें असतें. करितां वैषयिक जीवन हा मनुष्य-त्वाचा एक अनिवार्य प्रकृतिविशेष आहे.

विषयाची तृप्ति ही लग्नानें साधते, सिद्धीस जाते. विवाह न करतांहि प्रेमसंबंधानें वा क्षणिक मौजेच्या हौसेनें एकत्र आलेल्या स्त्री-पुरुषांनीं विषय-सेवन केलें तरी त्यांत वैवाहिक जीवनाचा निर्धास्तपणा आणि नितळपणा कधींच सापडणार नाहीं. लग्नाशिवाय सर्व प्रेमप्रकार हे तिऱ्हाईत दृष्टीनें पाहणारांना त्याज्यच वाटतात. बेहोष प्रणयी मित्रमैत्रिणींनाहि लोकमताला शेवटीं भिऊन वागावें लागतें. स्वतःलाच पापी समजणारा माणूस तर लोक-मताकडे भांबावलेल्या नजरेनें अहोरात्र पाहत असतो. उपभोगासाठीं निर्धास्त-पणा, सुदीर्घ सहवास आणि तितकाच दीर्घ एकांतवास लागत असतो. केवळ मानसिक देवघेवीपुरताच नव्हे तर शारीरिक सुखासाठींहि निर्धास्तपणा संपूर्ण असेल तरच त्यांचे व्यापार अप्रतिहत आणि सुखपरिणामी होणार. चोरून झालेल्या गाठीभेटी या तृप्तीचें माप व्यक्तिमात्राच्या पदरीं कधींच पडूं देत नाहींत. अतृप्तीनें आतुरता सारखी वाढते आणि अशा माणसाला तृप्ति कशी होईल हाच एक व्यग्रतेचा मोठा व्यवसाय होऊन राहतो.

लग्नसंस्था कायद्याच्या पंखांखालीं चांगली निवाऱ्याला बसलेली आहे. पति-पत्नींच्या एकाकी संबंधांत ढवळाढवळ करणाऱ्या तिऱ्हाइताला कायद्यामुळें कडक शासन मिळतें. फार काय, पण कर्तव्याला विसरून एकमेकांच्या संगती-पासून दूर जाणाऱ्या पतिपत्नींना एकत्र राहण्यास भाग पाडील अशी कायद्याची योजना असते. नुसत्या प्रेमसंबंधांत असें स्थैर्य, असा निवारा आणि अशी शाश्वती कधींच नसते. कोणाची बुद्धि फिरेल कीं काय म्हणून उभयतांनीं काळजी वाहावी, पुनः पुन्हा आणाशपथांची उजळणी करावी, एकाची बुद्धि फिरल्याचें पाहतांच दुसऱ्यानें कासावीस व्हावें आणि स्वतःस सोडून तिसऱ्या-बरोबर जातांच यानें इकडे निराश होऊन हात चोळीत बसावें अशा प्रकारचें हें 'स्थैर्य' नुसत्या प्रेमसंबंधाच्या वांट्यास येतें. अशा संबंधांतून होणारी प्रजा आणि प्रेमसंबंधाचा लपंडाव छपवण्याची यातायात, या सर्व अघोर आपत्तींमुळें शेवटीं मनुष्य पश्चात्तापच पावतो. लग्नसंस्थेची महती अगदीं केवळ व्यवहारी

दृष्टीनें पाहवी. धर्मांचे आणि नीतीचे त्याला टेके दिले तरच ती उभी राहील अशी ती वस्तुतः लुळीपांगळी नाहीं. एवंच, लग्नाशिवायचा प्रेमसंबंध सुखापेक्षां काळजी, समाधानापेक्षां विषाद यांचेंच माप पदरांत टाकतो.

वय वाढूं लागलें म्हणजे माणसाचें वैचारिक जीवितच जास्त जास्त विस्तार पावूं लागतें. शरीरसुखापेक्षां त्याला आपल्या विचारांची व विचारांच्या सलेख्याची महती जास्त वाटूं लागते. शरीरसुख समसमान उपभोगणारीं पतिपत्नी विचारांनींहि एकमेकांशीं ताबडतोब जमवून घेतात. लहानपणीं लग्न झालेल्या पतिपत्नींना विचार आणि आचार या दोन्ही बाबतींत सारखीच समरसता सहज निर्माण करतां येत असे. सुरुवातीला अशांची आकांक्षा केवळ शरीरसुखापुरतीच असे. नुकत्याच तारुण्यांत पाय ठेवलेल्या स्त्रीपुरुषांना शरीरसौंदर्य, सामर्थ्य, सौष्ठव ह्यांचीच भुरळ पडते. यांचीच ते मोजदाद घेत असतात. सुसंस्कृतता असणें, एकमेकांचीं मनें जमणें, ध्येयें एक असणें, वगैरे वैचारिक आकांक्षा व्यक्तिमात्रांच्या वैषयिक आकांक्षाच्या तृप्तींतून वयपरत्वें निर्माण होत असतात. आज वयानें प्रौढ झालेल्या स्त्री-पुरुषांच्या ठिकाणीं वैषयिक आकांक्षांची होत असलेली उपासमारी, वैचारिक आकांक्षांनाहि तशींच उपासमारीचीं काल्पनिक दृश्यें दाखवून भेवडावत असते. सरळ भाषेंत बोलवयाचें म्हणजे आजचे स्त्री-पुरुष लग्नाची गोष्ट काढतांच भयभीत होतात. त्यांना दुसऱ्याबरोबर आपलें पटेल कीं नाहीं, ह्याचीच विशेष भीति वाटते. पण ही भीति बऱ्याच वेळीं अनाठायींच असते म्हणवयाची !

उभयतां स्त्रीपुरुषांना आपले स्वभाव दुसऱ्याशीं पटतील कीं नाहीं अशी खरोखरीच भीति वाटत असेल, तर त्याला एकच सोपा उपाय आहे. आणि तो असा, कीं त्यांनीं आपल्या व्यक्तिमत्वाचें वा आपल्या स्वभाववैशिष्ट्याचें अवास्तव स्तोम माजवूं नये. दुसऱ्याच्या स्वभावाशीं जुळतें आणि दुसऱ्याच्या आवडीनिवडींशीं मिळतें घेण्याची खबरदारी प्रत्येकानें घेतली म्हणजे मग बेबनावाचे प्रसंग उत्पन्न होणार नाहींत. उभयतांच्या विचारांत थोडेंफार अंतर असणें हें संसाराला तितकेंसें धोक्याचेंहि नसतें. रोजच्या व्यवहारांत आणि संसाराच्या धबडग्यांत, विशेषतः स्त्री-पुरुषांचीं कार्यक्षेत्रें निरानिराळीं असतांना, तीव्र मतभेदाचे पेंचप्रसंग सहसा उत्पन्न होऊं नयेत. अगदीं बेबनाव असलेल्या माणसांचा सुद्धां एकत्र संसार झालेला आढळतो. एकमेकांनीं आपलीं

कार्यक्षेत्रें ओळखावींत, निश्चित करावींत आणि तेवढ्यापुरते आपले हेके कायम ठेवावेत, अशी उभयतांची तयारी असल्यास त्यांच्यांत बेननाव उत्पन्न होणार नाहींत; निदान त्यांतून संसारवणव्याच्या ठिणग्या तरी गळणार नाहींत हें खास.

अतएव दरेकानें लग्न करावें आणि तेंहि पण अगदीं निर्धास्तपणें आणि शक्य तितक्या लवकर करावें. बऱ्याचशा अडचणी आणि बऱ्याचशा काळज्या केवळ काल्पनिक असतात. अविवाहितांच्या कांहींकांहीं अडचणी तर अशा असतात कीं, त्या लग्नानें दूर झाल्या तर व्हायच्या. मानवी जीवन हें स्त्री-पुरुषांचें मिळून झालेलें असतें. त्यांचा अभिन्न असा एकत्रपणा हा मानवी वंशाचा आधारस्तंभ ! आणि त्यांचें अखंड निगडित जीवन हें उत्कर्षाचें ध्रुव-दर्शन ! ! स्त्रीपुरुष लग्नाच्या निमित्तानें कायमचे, निर्धास्तपणें एकत्र राहूं शकतात. कायिक सौख्य, वाचिक आनंद आणि मानसिक स्थैर्य ह्यांची प्राप्ति दरेकजण करून घेऊं शकतो. लग्नाशिवाय राहणारे असंतुष्ट स्त्रीपुरुष निसर्गाचे शतशः अपराधी आहेत; नैसर्गिक प्रवृत्तींना वठवून टाकण्याच्या दोषामुळें, व्यक्तित्वाच्या प्रकटीकरणाची गळचेपी केल्यामुळें, मानववंशाच्या उच्छेदनाच्या आरोपामुळें. पांढरपेशा गरीब समाजांतूनच तेजस्वी पिढी निर्माण होत असते. पण इकडे पाहावें तों पांढरपेशा समाजांतील तरुण-तरुणी प्रौढविवाहावरून आजन्म कौमार्याकडे धांपा टाकीत धावत सुटलेलीं दिसतात. हें त्यांचें करणें राष्ट्रीय दृष्टीनेंहि दोषार्हच ठरेल. आज ज्या तरुणतरुणींना अविवाहित राहावें लागतें तें दैवी शापामुळें नव्हे. उलट स्वतः अविवाहित राहणारींच मंडळी भावी तेजःपुंज स्वतंत्र हिंदुस्थानाला एकसारखा शाप देत असतात. अविवाहित मंडळी शापानें स्वतः दग्ध होऊन ऐहिक आनंदाला आंचवतात, इतकेंच नव्हे तर उद्यांच्या जगावर वंशच्छेदनाचे निखारे ठेवून कायमचा शाप देऊन निघून जातात.

---

# स्वैराचाराची छाननी : : २

वैषयिक स्वैराचाराला भेवडावणारा पापाचा बाऊ आतां नाहींसा झाला! आणि तो बाऊ तरी स्वैराचाराला फारसा आळा घालूं शकला नव्हताच कधीं!! स्वैराचार ही वैयक्तिक स्वातंत्र्याची बाब होऊन राहिल्यापासून, धार्मिक विधिनिषेधांच्या हुकमतीबाहेरची ती आहे, असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें आहे. आणि धार्मिक ग्रंथ, कीं ज्यांत पर्यायानें अठरा पुराणांचाहि समावेश होतो, त्यांतील थोरांचे दुराचार आजहि बुद्धिवादी माणसाचें मस्तक तापवावयास लावतील! नीति-अनीतीची मोठी कसोटी म्हणजे आपला धर्म! पण धर्माचीच आज येवढी त्रेधातारांबळ उडालेली दिसते, कीं त्याचें मतहि कोणी विचारीत नाहीं. खुद्द धर्माच्या नांवाखालीं दुराचार इतका राजरोस बोकाळलेला आढळेल, कीं धर्माला आमच्या नीतिमत्तेचें आकलन करण्याचा अधिकारच काय, असेंहि विचारावेंसें वाटतें. आजचें मोठ्यांतलें मोठें धर्मशास्त्र, आजची नीतिस्मृति म्हणजे 'इंडियन पीनल कोड!'

फौजदारी कायद्याबाहेरचीं ठिसूळ नीतितत्त्वें नेहमींच बदलत्या समाजाच्या लोंढ्यानें खरूं लागतात; कालांतरानें नाहींशींहि होतात. आज स्वैराचाराला

जर पायबंद कुठें घातलेला आढळत असेल, तर तो 'इंडियन पीनल कोडा'च्या चारदोन कलमांतच. जिचा नवरा हयात आहे अगर असेल, असें मानण्यास कारण आहे, तिच्या नवऱ्याच्या परवानगी अगर संमतीशिवाय अशा स्त्रीशीं संबंध ठेवणें हा गुन्हा होय. तथापि असल्या गुन्ह्याबद्दल फक्त त्या स्त्रीच्या नवऱ्यासच फिर्याद करतां येईल. अल्पवयी स्त्रीशीं केलेला संभोग दंडनीय आहे. कुणाची लग्नाची बायको अगर कुणाच्या ताब्यांतील अल्पवयी मुलगी पळवून नेणें हाहि गुन्हा होय. अशा मोजक्या बाबतींतच फौजदारी कायदा आमच्या वैषयिक नीतिमत्तेचें आकलन करतो. या कलमांत न येणाऱ्या गोष्टी करण्यास कायद्याची मुभाच समजायची! या दृष्टीनें कुमारिका अगर विधवा स्त्रियांशीं कोणीं अनैतिक संबंध ठेवल्यास कायदा आड येत नाहीं. खुद्द सुवासिनीचें उदाहरण घेतलें तरी तिच्या नवऱ्याची परवानगी अगर संमति असेल तरी काम भागतें. बायकोला टाकून देणारा नवरा तिच्या नीतीची उठाठेव कशाला करील? आणि तिच्याशीं संबंध ठेवणाऱ्याविरुद्ध कशाला फिर्यादीचा खटाटोप करील? एवंच, कायदा, धर्मशास्त्र, नीति, रूढि, ह्यांपैकीं कोणीहि स्वैराचाराला आळा घालण्यास आज समर्थ नाहीं. स्वैराचाराची भूमिका बुद्धिवादाच्या कसोटीनें तपासली पाहिजे, मनोविश्लेषणशास्त्राच्या तत्त्व-सिद्धांताच्या कसावर घासून पाहिली पाहिजे. खासगी चारित्र्य आणि सामाजिक आरोग्य ह्यांच्या मापानें ती मोजली पाहिजे. व्यक्तीच्या आशा आणि मानववंशाच्या आकांक्षा यांच्या ताजव्यांत ती तोलली पाहिजे. या निरनिराळया कसोट्या लावून ती जर हिणकस ठरली तरच ती त्याज्य ठरेल.

स्वैराचाराला जरूर ती निकडीची पार्श्वभूमि कष्टदायक अर्थशास्त्र आपल्या ओढाताणीनें आपोआप एकसारखी उभारून ठेवीत आहे. प्रौढ विवाहोत्सुक तरुण पिढी झपाट्यानें अविवाहित राहूं लागली आहे. जीवन-कलहाच्या हुल्लडींत स्त्री-पुरुष वरचेवर अधिकाधिक एकमेकांजवळ खेटून येऊं लागले; वाढत्या दैन्याच्या निराशेनें बेहोष होऊन, एकच्या एक शिल्लक राहिलेला वैषयिक आनंद पदरांत पडेल तेवढा घेण्यासाठीं ते धडपड करूं लागले आहेत. एवंच, परिस्थिति, काळ, वेळ, देशस्थिति हीं सर्व स्वैराचाराला अनुकूल आहेत. असेंहि म्हणावेंसें वाटतें, कीं स्वैराचाराचा पंथहि आजच्या बिकट

आर्थिक परिस्थितींतून निर्माण झाला आहे. नवमतवाद म्हणून ओळखला जाणारा संप्रदाय हाहि स्वैराचाराची कधीं प्रत्यक्ष तर बहुतेक वेळीं अप्रत्यक्ष तरफदारी करतांना आढळतो. तरुण पिढीला असें वाटतें, कीं लैंगिक स्वातंत्र्याची बाब म्हणजे कांहीं एवढी मोठीशी बाबत नाहीं. त्यांत मनाच्या अगर शरिराच्या आरोग्यविषयक घटना कांहीं सामावलेल्या नाहींत. स्वैराचारा-विरुद्धची सर्व बाजू नीट ऐकून घेतल्याशिवायच ते खुशाल त्यांत उडी घेतात. मग ती तात्पुरती, कधींमधीं का कायमची डुंबण्यासाठीं, तें त्यांच्या परिस्थिती-वर, पैशाअडक्याच्या बलाबलावर, अनुकूल-प्रतिकूलतेवर अवलंबून राहते. नीट विचार न करतां त्यांत सामील होणाऱ्या व्यक्तींच्या– विशेषतः तरुणींच्या– मनाच्या घडणींत कायमचीं अशीं जीं घातुक स्थित्यंतरें स्वैराचारानें होतात त्यांची ह्या मंडळींना तोंडओळखहि नसते.

अंधार पडूं लागण्याच्या सुमारास बागांतून स्त्रीपुरुषांनीं एकमेकांना खेटून भटकणें, हॉटेलाच्या बंद खोल्यांत खाण्यापिण्याच्या निमित्तानें एकमेकांसरशीं बसणें, टेबलाच्या आच्छादनाखालीं लपलेल्या पायांनीं एकमेकांना ढुसण्या देणें, रात्रीं रस्त्याच्या बाजूस उभ्या राहिलेल्या दिवे मालवलेल्या मोटारींतून अगर राहण्याची सोय करणाऱ्या हॉटेलांतून प्रणयी जनांनीं एकमेकांस भेटणें, ह्या प्रथा वाढत्या प्रमाणांत दिसून येत आहेत. तरुण पिढीला लैंगिक गोष्टींबद्दल आतां संकोच म्हणून उरलेलाच नाहीं. प्रतिकूल परिस्थितींत कुचंबणारी भेकड तरुण मंडळी, स्वतःची वैषयिक मनीषा लग्नानंतर तृप्त करण्याच्या आशेवर दिवस काढतात. पण अशांनाहि दुसऱ्याच्या स्वैरवर्तनाबद्दल कांहींच वाटत नसतें. उलट आंतून तीं त्या धाडसी माणसांचें कौतुक अगर हेवाच करीत असतात. अविवाहित मातांची संख्या तितकी जास्त दिसत नसली, तर त्याचें श्रेय संततिनियमनाच्या साधनांनाच द्यावें लागेल. तरी सुद्धां असें म्हणावें लागेल, कीं अविवाहित मातांची आणि गरोदर कुमारिकांची संख्या वाढत्या प्रमाणांत आहे. व्यभिचारास रूढींची सरसहा मान्यता मिळालेली नाहीं. सदाचार हाच अजूनहि आदरणीय आहे. किती तरी तरुण मुली अशा सापडतील, कीं स्वैराचाराची कल्पना त्यांच्या मनाला शिवत देखील नाहीं. शाळेंतला अभ्यास, घरचें कामकाज, खेळ, हौसेचे व्यासंग, ह्या कार्यक्रमांत व्यवस्थेशीरपणें त्यांचा वेळ जातो. ह्या स्त्रियांना वैषयिक बाबतींत विचार

करण्यास फुरसतच नसते. घरांतलें सदाचारी, संयमी व मोकळें वातावरण हेंहि स्वैराचाराच्या विषवायूला कानाकोपऱ्यांतहि दडून वावरूं देत नाहीं. पण अशा मंडळींच्या कानींकपाळीं स्वैराचाराबद्दलची चालढकल्च काय, पण व्यभिचाराची तरफदारीहि अधूनमधून एकसारखी पडत असते. म्हणून ह्या विषयाची कोणताहि आडपडदा न ठेवतां चर्चा झाली पाहिजे. ह्या विषयाची जाहीर चर्चा करूं नये, असेंहि कित्येक पालक आणि वडील मंडळी म्हणतात. पण आपण ही मोठ्यांतली मोठी चूक करीत असतों. गौप्य-गोपनांनींच विपरीत औत्सुक्य एकसारखें वाढत जातें. शिवाय वडील मंडळींनीं ह्या गुपित ठेवलेल्या लैंगिक बाबतींबद्दल तरुण मंडळी उघड उघड चर्चा करीत असतात. 'त्यांत काय आहे ?' असें तरुण दुसऱ्यास सांगून फशीं पाडतात. फार काय, पण कांहीं जबाबदार वडील मंडळी तरुण पिढीचा लोभ संपादण्या-साठीं अगर आपणहि मनानें तरुण आहोंत अशी संपादणी करण्यासाठीं 'त्यांत काय आहे ! असंच चालायचं !' असे बेजबाबदार उद्गार काढतात. गोल साडी नेसणें अगर लहंगे घालणें, ह्यांच्याइतका स्वैराचार निरुपद्रवी असेल अशी स्वतःची भलतीच समजूत त्यांनीं करून घेतल्यास न कळे ! वैद्यकीय अगर मानसशास्त्रीय दृष्ट्या लग्नाव्यतिरिक्तचा स्वैराचार हा परिणामीं इतका क्षुल्लक राहत नसतो. या दोन्ही शास्त्रांतील तज्ज्ञांच्या विचारानें स्वैराचाराचे व्यक्तीवर आणि समाजावर जे अनिष्ट परिणाम होतात. त्यांची जाहीर चर्चा होणें जरूर आहे.

आपणांकडे लैंगिक बाबतींत आंकडे गोळा करण्याची प्रथा नाहीं. वैवाहिक बाबतींतहि अगदीं ठोकळ अशीं सदरें गेल्या खानेसुमारींत कित्येक ठिकाणीं दाखल करण्यांत आलीं होतीं. परंतु सर्वांची तक्रार आहे, कीं लोक खऱ्या हकीकती सांगत नाहींत. खुद्द इंग्लंडमध्येंहि असे आंकडे सालेसाल गोळा करीत नाहींत; मात्र अमेरिकेंत आंकडे गोळा करण्याचा प्रघात रूढ झालेला आहे. अर्थात् अमेरिकन लोकांची राहणी, आचारविचार, परिस्थिति हीं सर्व हिंदवासीयांहून अगदीं भिन्न आहेत. तथापि अमेरिकेसारख्या सुधारलेल्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या माहेरघरीं काय प्रकार आढळून येतात तें पाहण्यासारखें आहे. साधारणतः शेंकडा दहापंधरा टक्के माणसें फिरंगी रोगानें पीडित अशीं अमेरिकेंत सापडतील, असा अमेरिकन सोशल हायजिन ॲसोसिएशनचा अदमास आहे. हे फिरंगी रोग

माणसांना सोळा ते तीस वर्षांच्या तारुण्याच्या ऐन उमेदींत मोठ्या प्रमाणांत जडतात, असें आंकड्यानिशीं शाबीत झालें आहे. फिरंगी रोगांचें अजीबात उच्चाटण झालें तर स्वैराचारावरचें एक मोठेंच संकट नाहींसें होईल, हें सारें खरें; परंतु सध्यां तर चोरून ठेवल्यानें त्या रोगाचा फैलाव एकसारखा वाढत आहे. हे फिरंगी रोग जडण्याचा काळहि गद्धेपंचविशीचाच साधारणपणें असतो. तरुण पिढीची नीतिमत्ता कमी प्रतीची होत चालली आहे अशांतला भाग नव्हे; परंतु लग्नाची वयोमर्यादा एकसारखी वाढत जाऊं लागल्यानें स्वैराचारास अनपेक्षित उत्तेजन मिळत आहे, हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. स्वैराचाराचें बीज, तरुणींच्या सहवासानें अगर सहवासाच्या दुर्दम इच्छेनें, तरुणांच्या मनांत पेरलें जातें खरें; परंतु त्या प्रखर क्षुधेचें पहिलें पारणें सुलभ अशा वेश्यासंबंधाच्या खाणावळींत सोडण्यांत येतें आणि त्याची कायमची आठवण म्हणून फिरंगी रोग जडल्याशिवाय राहत नाहीं.

कांहीं बाबतींत, निखालस खोटी अगर अविश्वसनीय अशी माहिती तरुण पिढीच्या कानीं येऊन पडत असते. विशेषतः संततिनियमनाच्या साधनांची व त्यांच्या गुणांची. जाहिरातीच्या युगांत खऱ्याखोट्याची चाललेली सरभेसळ ओळखतां येईनाशी झाली आहे आणि उपयोग-साधनांची निर्वेधता विनाकारण प्रस्थापित झाली आहे. ह्या साधनांवर फाजील विश्वास ठेवणाऱ्या स्त्रियांचे गळे सपशेल कापले जातात. संततिनियमनाचे उपाय तत्त्वतः कमीअधिक प्रमाणांत उपयोगास येतात त्याबद्दल वाद नाहीं. त्या उपायांचें संपूर्ण ज्ञान असेल तर साधनांची खरी किंमत ठरवितां येईल; त्यांचा बरोबर उपयोगहि करतां येईल. नुसत्या जाहिरातीवर विसंबणारी मंडळी सपशेल फसतात, दुसऱ्यांसहि प्रामाणिक धीराच्या गोष्टी सांगून फसवितात. सर्व झळ स्त्रियांना लागते. तज्ज्ञांनीं योग्य ठरविलेलीं औषधें फार झालीं तर पन्नास टक्के गुणकारी ठरतात. शिफारस केलेलीं रबरी साधनें त्याच मानानें कमीअधिक प्रमाणांत यशस्वी निपजतात. स्त्रियांच्या प्रकृतिमानानें त्यांना कांहीं औषधें मानवतहि नाहींत, कांहीं उपाय लागू पडतहि नाहींत, असें अगदीं तज्ज्ञ सांगतात. स्वैराचार हा कमीअधिक प्रमाणांत चोरटा आणि म्हणूनच धावपळीचा असतो. नियमनाचीं साधनेंहि जेवढ्या कसोशीनें उपयोगांत आणावीं

लागतात, तेवढ्या कसोशीनें त्यांचा उपयोग करण्यापुरती फुरसत आणि एकान्त कुठून सापडणार ?

अगदीं शंभर टक्के निर्धोस्त साधनांच्या विश्वासावर आधार ठेवून संवगड्याशीं विहार करणाऱ्या युवती ज्वालामुखीच्या शिखरावरून चालत असतात. अविवाहित माता ह्या तरी अशा फसलेल्या वा फसविलेल्याच असतात ना ! अगदीं अत्यंत सुधारलेल्या देशांतहि अशा अविवाहित मातांना समाजांतून कायमच्या उठवून लावलेल्या असतात. मग आपल्या मागासलेल्या हिंदुस्थानांतील अविवाहित मातांची गोष्ट विचारायलाच नको. अविवाहित माता गर्भपात करण्याचा खटाटोप करून पाहतात. त्यांतहि संकटें कांहीं कमी नसतात. डॉ. फ्रेड्रिक डॉसिंग म्हणतो, कीं रीतसर बाळंतपणांतल्यापेक्षां गर्भपाताची केस बिघडण्याची जोखीम दसपट जास्त आहे. गर्भपातांत बऱ्याचजणींच्या जिवाला धोका पोंचतो आणि त्यांतून ज्या निभावून निघतात त्या जन्माच्या अधु, वांझ व निरुपयोगी होतात. श्रीमंत कुटुंबांत कुमारिकांच्या पोटांच्या व्याधींच्या शस्त्रक्रिया आणि गरिबांचे गर्भपात, हा शिष्टनियम होय असें जस्टिस मॅकॉर्डी म्हणत असे. अनाथाश्रमांतील अविवाहित मातांच्या बाळंतपणाची वाढती नोंद काय दर्शविते ? तिच्या शरीरावर होणारे अनिष्ट परिणाम कांहींच नाहींत असले भयंकर परिणाम तिच्या मनावर कायमचे होतात ! स्त्रियांच्या मनांत अपत्यप्रेम ही अगदीं सर्वव्यापी भावना आहे. कापून टाकलेल्या अगर टाकून दिलेल्या अपत्याबद्दल त्यांच्या मनांत जन्मभर रुखरुख लागून राहते. खुद्द बाळंतपणाच्या प्राणांतिक वेदना त्या सहन करतात त्याहि अपत्यप्रेमामुळेंच ! त्याचें बक्षीसहि त्यांना मिळतें. मुलाचा लाभ, पतीची सहानुभूति, सामाजिक प्रतिष्ठा, हींच तीं पारितोषिकें होत. अविवाहित मातांच्या हातीं यांपैकीं कांहींच लागत नाहीं.

वैषयिक क्षुधा लग्नाखेरीज भागवितां येऊं लागली म्हणजे लग्नसंस्थेवर आपोआपच हळूहळू बहिष्कार पडूं लागतो; आणि उभयतां स्त्रीपुरुष आजन्म अविवाहित राहूं लागतात. लग्न करणें म्हणजे अनेक जबाबदाऱ्या पत्करणें, कायमचें स्वतःस बांधून घेणें आहे खरें; परंतु त्याहि दिव्यांत उडी घेण्यास माणसें तयार होतात तीं अतृप्त आणि प्रखर कामुक प्रवृत्तीमुळेंच ! पण जर कामुक व्यापार लग्नाशिवाय अव्याहत चालूं लागले तर लग्न तरी कोण कशाला

करील ! समाजधारणेच्या व वैयक्तिक सुरक्षिततेच्या दृष्टीनें लग्नसंस्था ही सामाजिक आद्यघटना त्रिकालाबाधित राहणार, राहिली पाहिजे. आणि त्या आवश्यक घटनेच्या पायांत जर कोणता दुष्ट शत्रु अनर्थांचे सुरुंग पेरून ठेवीत असेल, तर तो अविवाहितांचा स्वैराचार होय. अनिच्छित संततीचीहि मातृहृदयाला आबाळ करवत नाहीं. तारुण्य आणि सौंदर्य ओसरून गेल्यावर आणाशपथांची लाखोली प्रत्यहीं वाहणारा प्रियकर तिला सोडून जातो, तर नवीन सौंगडी तिला कशानें मिळणार? तेव्हां मुलांबाळांच्या संरक्षणासाठीं, स्वतःच्या औदारिक वा वैषयिक क्षुधाशमनासाठीं, कायमचे स्त्रीपुरुषसंबंध निर्माण होणें हें स्त्रियांच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. लग्न म्हणजे बंधन तर खरेंच; थोडाफार कोंडमाराहि खराच; पण मोकळ्या हवेची कितीहि महति गायिली तरी निवाऱ्यासाठीं घरें हीं बांधावींच लागतात. बदलत्या ऋतुमानांचे प्रचंड आघात आणि शेजाऱ्यांचें आपमतलबी आक्रमण, यांच्यापासून रक्षण करण्यासाठीं घराभोंवतीं मजबूत भिंती घालाव्या लागतातच. लग्नसंस्थेच्या आसऱ्याची स्त्रीलाच विशेष जरूरी असते. लग्न न करतां, केवळ स्वैराचाराच्या पाणोठ्यावर तहान भागविणारी स्त्री, ही वेश्येपेक्षांहि हलकी ठरते. वेश्या ही स्वतःच्या देहाची किंमत तरी उभी करीत असते; त्या किंमतींतून म्हातारपणासाठीं तरतूद तरी ती करूं शकते; निखालस कंगालांच्या टोळधाडीपासून ती अलिप्त राहते. वेश्येच्याहि खालीं जाऊन बसणारी अविवाहित स्वैरिणी समाजाच्या पायदळीं तुडविली जाते; तिच्या भावना, आकांक्षा, प्रतिष्ठा यांचा चेंदामेंदा होतो !

अतृप्त वासना ह्या भलत्याच मानसिक विकृति उत्पन्न करतात, म्हणून वासना अतृप्त ठेवूं नयेत, असें प्रतिपादन करणारा संप्रदाय स्वैराचाराचें नेहमीं समर्थन करण्यास सरसावलेला असतो. पण अतृप्त वासनांमुळें येवढ्या जबरदस्त मानसिक विकृति निर्माण होतात कीं काय, कीं त्यांच्या तृप्तीचे आक्षेपार्ह मार्गहि पीडितांनीं चोखाळावेत ! कोणतींच बंधनें नकोत असें म्हणणाऱ्या स्वैराचारी लोकांनीं वासनांचे भलतेच चोजले माजवून ठेवले आहेत व ते पुरविणाऱ्या घातुक मार्गांचें अनाठायीं समर्थन चालविलें आहे. अतृप्त वासनांचें हें मानसशास्त्र, अनुचित तृप्तींतून निर्माण होणाऱ्या मानसिक विकृतींचें, विपरीत प्रवृत्तींचें आणि घातुक संबंधाचें मानसशास्त्र मुळीं मुद्दाम दृष्टीआड करीत असतें ! परंपरा, रूढि, नैतिक कल्पना, सामाजिक प्रतिष्ठा, ह्या गोष्टी आम्ही झुगारून देऊं

असें मी मी म्हणणारेहि त्यांच्या भीतीनें आंतून व्याकुळ झालेले असतात. आणि खरोखरीच लोकविरुद्ध वागणाऱ्या धाडसी व्यक्तींचीं मनें पापाचरण केल्याबद्दलच्या रुखरुखीनें व्याकूळच झालेलीं आढळतील. स्वैराचार समाजानें जोंवर अजून मान्य केलेला नाहीं, तोंवर तो करणाऱ्याला जनांचीच काय पण मनाचीहि लाज वाटल्यावांचून रहाणार नाहीं. आपण कांहींतरी गुन्हा करीत आहोंत, ही भावनाच त्यांच्या त्या विषयसुखावर विरजण घालते. पुरुष तेव्हांच निर्लज्ज होऊं शकतो. स्त्रीला स्त्रीत्व जसें टाकतां येत नाहीं, तशी लज्जाहि टाकतां येत नाहीं. ती जर निर्लज्ज, निगरगट्ट होऊं शकली नाहीं, तर तिचें मन तिला सारखें तोडीत असतें. अशा पश्चात्तप्त स्त्रीला विषयसुख असुखद वाटतें. विषयसुख पापी वाटूं लागल्यानें पुढेंपुढें तिला तें नकोसें होऊं लागतें. वासना दाबून टाकण्याच्या विकृतीपासून स्वैराचार मनुष्याला बचावतो असें म्हणावें, तर खुद्द स्वैराचारांतून दुसऱ्या मनोविकृति निर्माण होतात त्यांची काय वाट? स्वैराचार म्हटला तरी त्याला राजरोस वावरतां येत नाहीं. नवरा-बायकोची प्रतिष्ठा त्यांना लाभत नसल्यानें प्रणयी जनांना एकमेकांच्या आश्रयानें, आधारानें, निर्धास्तपणें आणि उजळ माथ्यानें जगांत वावरतां येत नाहीं.

स्त्रीपुरुष-संबंध हा जितका शारीरिक, त्याच्या हजारपटीनें तो मानसिक स्वरूपाचा असतो. स्वैराचारी माणसांच्या शारीरिक वासना जसजशा तृप्त होऊं लागतात, तसतशा त्यांच्या मानसिक क्षुधा वाढत जातात. उघड मैत्री, निर्धास्त एकत्र वास, निरंतर आधार, ह्या ज्या स्त्रीपुरुषसंबंधाच्या जिव्हाळयाच्या बाबती, त्यांवर ह्या स्वैराचारी लोकांना पाणी सोडावें लागतें. एकटें विषयसुख हेंहि अगदीं पशुवृत्तीच्या खालीं येऊन पोंचतें. बरें, ज्यांनीं लाजलज्जा गुंडाळून ठेवली अशा झोंड तरुणींची तरी पुढें काय अवस्था होते? बहुतेक, यौवन आणि मित्रपरिवार, हीं एकाच पावलानें अशांना सोडून जाऊं लागतात. 'मी माझें पाहून घेईन' असें ती धिटाईनें म्हणेल; आणि वेळहि अशीच येते कीं तिचा प्रियकर तो अवघड प्रयोग करण्यासाठींच तिला मोकळी सोडून देत असतो. अशी बेफाम कुमारिका लोकांतून एकदम उठते.

समाजाची प्रतिष्ठाच काय, पण रक्षणहि तिला मिळेनासें होतें. बंडखोरीमुळें ती शेफारून गेली, तरी बंडखोरीचा चोरटेपणा आणि एकलकोंडेपणा ह्यांचे

क्लेश तिला भोगावे लागतातच. स्वैराचाराबद्दल एखादीचा खराखोटा बभ्रा झाला म्हणजे तिला आजन्म अविवाहितच राहवें लागतें. पहिल्या प्रियकरानें सोडून दिल्यामुळें म्हणा अगर लग्नाशिवाय विषयसुखाचा उपभोग घेतां येतो म्हणून म्हणा, पण अशा स्वैराचारी स्त्रिया बऱ्याचशा अविवाहितच राहतात. अशा ह्या स्वैरिणी एकंदर लग्नसंस्थेला खिळखिळी करतात. प्रापंचिक सुखी सुवासिनींच्या संसारसुखावर टेहळणी करीत फिरणाऱ्या ह्या स्वैरिणी गिधाडी झडपा घालून त्यांचे नवरे पळवितात. आणि खुद्द स्वैरिणीचें एकलकोंडें आयुष्य हेंहि निराशा, दुःख, निराधार, तिरस्कार, ह्यांनीं दयाजनकच दिसतें.

ह्या स्वैराचाराचा शरीरावरहि अनिष्टच परिणाम होत असतो. सर्व व्यवहार चोरूनच करावयाचे असल्यानें निर्धास्त एकांत व मनमुराद ऐषआराम ह्यांची छाया त्यांना कधींच लाभत नाहीं. प्रणयीजन एकत्र आले तरी ते एकत्रपणांत राहूं शकत नाहींत. करकरीत तिन्हीसांजचा काळ, हॉटेलें, मोटारी, बागा, जिन्याचे कोपरे, अंधेऱ्या छपरांच्या वळचणी, ह्या ठिकाणीं त्यांना भेटीगाठीं घेण्यास वेळ तो कितीसा सांपडणार? आणि त्यांच्या अनेक भुकांची, आकांक्षांची तृप्ति कशी होणार? कुणी पाहिलें का, कुणी ऐकलें का, कुणी पाळतीवर आहे का, ह्या भीतीनें धडधडणाऱ्यांना विषयसुखहि पुरेपूर कसें घेतां येईल? त्यांना विषयतृप्तीचें समाधान तरी कसें लाभेल? विषयवासनेचा खळखळाट उसळणार तोंच त्याला भीतीचे बांध बसणार! विषयसुखसेवनास स्नायूंच्या कित्येक क्रिया-प्रतिक्रिया आवश्यक असतात; आणि भीति, धास्ती मनांत उत्पन्न होतांच त्या क्रिया-प्रतिक्रिया थंड पडून त्या सुखालाच अंतरावें लागतें! ह्या क्रिया-प्रतिक्रियांची नाकेबंदी शारीरशास्त्रदृष्ट्या अत्यंत विघातक होय. स्वैराचारी संबंधांतून सुखापेक्षां निराशा, तृप्तीपेक्षां असंतोष, हींच निष्पन्न होतात आणि एकंदर विषयसुखाबद्दल विकृत कल्पना निर्माण होत जाते. तें प्रणयी जोडपें लग्नाच्या निमित्तानें निगडित झालें तर मिळवलें म्हणावयाचें! आणि लग्नापूर्वीं अगदीं एकाकी प्रेमसंबंधांत स्वैराचाराची सवलत बेसुमार उपभोगणाऱ्या जोडप्यांना लग्नानंतर एकदम निराशाच वाटूं लागते. लग्नाच्या जबाबदाऱ्या, एकमेकांशीं आणि परिस्थितीशीं पटवून घेण्याची आवश्यकता, ह्या जिकीरीच्या घटनांशीं दोघांनीं मिळून झगडावयाचें असतें. अशा वेळीं अननुभूत विषयसुखाच्या गोडीनेंच एकजीव झालेलीं नवपरिणत जोडपीं हिंमतीनें

जीवनकलहाला तोंड देऊं शकतात. स्वैराचारी स्त्रीपुरुषांना विषयसुखाच्या तृप्तीचे, प्रकारांचे नवे शोध असे कांहींच शिल्लक राहिलेले नसल्यानें परिस्थितीशीं झगडण्याची जिकीरच तेवढी त्यांच्या वांट्याची कायम राहते. स्वैराचार हा लग्नाच्या आड येतो; इतकेंच नव्हे तर लग्नानंतरहि तो अशा व्यक्तींच्या तोंडाला निराशेचीं पानें पुसतो !

असले स्वैराचारी प्रेमसंबंध थोडा काळ टिकणारेच निघतात. तत्कालीन सुखाला अगर कुतूहलवृत्तीला हपापलेली तरुण मंडळी स्वैराचार म्हणजे एखाद्या वेळीं करून पाहण्याचें 'गोड धाडस' आहे असें समजतात; पण खरी गोष्ट तशी असते का ? सर्वसाधारण प्रवृत्तीच्या मुलीच्या दृष्टीनें असला हा धाडसी प्रयत्न निरुपद्रवी आणि क्षणिक ठरतो का ? अशा या क्षणिक व तात्पुरत्या समजल्या जाणाऱ्या प्रयोगानें तिच्या ठिकाणीं नवऱ्याबद्दल वाटणाऱ्या सर्व संसारी अपेक्षा एकदम जागृत होतात आणि त्या सौंगड्यावरच त्या कायमच्या स्थिरप्राय होतात. वैषयिक सुखसाधन आणि आधाराचें मानसिक समाधान, ह्या गोष्टी स्त्रियांच्या स्वभावरचनेंत अभिन्नत्वानें एकदम जागृत होत होत असतात आणि पहिल्या सौंगड्याच्या भोंवतींच विकारांचीं आणि विचारांचीं जाळीं त्या भराभर टाकीत असतात. या जाळ्यांनीं पुरुषाला जखडून टाकण्याच्या प्रयत्नांत त्याच त्यांच्या जाळ्यांत पुरेपुऱ्या जखडल्या जातात. पुरुष जर का तो धाडसी प्रयोग तात्पुरताच समजून दुसरीच्या नादीं लागला, म्हणजे मग हिची अवस्था काय होते ? घर बांधणाऱ्या कारागिरांच्या अंगावरच बांधीत असलेलें घर जसें कोसळून पडावें व ते ठार व्हावेत, तसें तिचें तें तुटलेलें जाळें तिच्याच हातापायांना विळखे घालून निराशा, मत्सर, पश्चात्ताप ह्यांच्या उकळत्या कढयांतून तिला जिवंत तळून काढतें. प्रथमसंबंधांत झालेल्या निराशेमुळें बऱ्याच वेळां तिच्या ठिकाणीं न्यूनगंड तरी निर्माण होतो, नाहीं तर मत्सराचें आणि पश्चात्तापाचें दुःख घालविण्यासाठीं ती उघड उघड स्वैरिणी तरी बनते.

स्वैरिणीचें मन स्वतःच्या आकर्षक सौंदर्याबद्दल एकसारखें अधिकाधिक साशंक होत जातें आणि स्वतःच्या आकर्षक गुणांबद्दलची खात्री करून घेण्यासाठीं ती अनेक पुरुषांशीं अनेकविध अनुभव घेण्यास उद्युक्त होते. हा न्यूनगंड स्वैराचारी पुरुषांच्याहि मनांत निर्माण होऊं लागतो आणि कमी

वाटणाऱ्या ताकतीबद्दल खोटा अभिमान ठेवून तिची खात्री पटविण्यासाठीं तेहि आपल्या जिवाचा कांहीं कमी आटापिटा करीत नाहींत. ज्याला गृहस्थाश्रमाच्या सुखी जीवनाच्या सावलींत आयुष्य कंठावयाचें असेल, अशांच्या मनांत ही मनोवृत्ति एकदां का वावरूं लागली, कीं तो भावनाशील वागणुकीस पारखा होतो; स्वतःच्या पत्नीस सुख देईनासा होतो. स्वैराचारी स्त्री-पुरुष एकाकी लग्नसंबंधास टिकून राहत नाहींत. पूर्वीचें स्वैरचारित्र्य हें निर्वेध आणि निर्मळ संसारसुख त्यांना लाभूं देत नाहीं; उलट, प्रतिक्षणीं तें गैरविश्वासाचीं भुतें निर्माण करीत असतें. विषयसुखांतील खुमारी जाते; मात्र अतृप्त विकारांची प्रखर क्षुधा सारखी वाढत जाते.

जगांतील मौल्यवान ठेवा म्हणजे प्रेम. पण हा स्वैराचार कधींच कुणाच्यीं हातीं तो मोठ्यांतला मोठा ठेवा पडूं देत नाहीं. जगाच्या नीतीच्या कल्पना बदलल्या आहेत, असें आपण खुशाल म्हणावें पाहिजे तर; परंतु मानवी मनाची घडण अजून कायमच आहे. तिच्या क्रिया-प्रतिक्रियांमुळें उत्पन्न होणाऱ्या विपरीत मनोवृत्ति जशाच्या तशा कायम आहेत. माणसांचे विचार बदलले, पण भावना अजून जशाच्या तशाच आहेत. स्वैराचारामुळें भावनांच्या चिंध्याचिंध्या होतात, तर भावना स्वैराचाराचा धिक्कारच करीत असतात.

स्वैरिणीच्या नवऱ्यास मनांतून एकसारखी धास्तीच वाटत असते, कीं लग्नानंतरहि ही कोणत्या वेळेला डोळा चुकवून चौखूर उधळेल ह्याचा नियम नाहीं. लोकनिंदेला जिनें कौमार्यावस्थेंत जुमानलें नाहीं, ती निर्धास्त अशा सुवासिनीच्या अवस्थेचा गैरफायदा घ्यायला कितपत कचरणार ? निरनिराळ्या पुरुषांबरोबरच्या क्षणिक सुखानुभवाला चटावलेल्या स्वैरिणीला एकच्या एका पुरुषाशीं संसार करणें तितकेंसें आल्हादकारक वाटेनासें होतें. आणि तोच प्रकार स्वैराचारी पुरुषांचा. त्यांच्या मनांत व्यक्तींच्या तुलना सुरू होतात. आणि तुलना सुरू झाली, कीं जिनसेची किंमत आणि ती हस्तगत केल्या-बद्दलचें आनंदी समाधान, हीं नाहींशीं झालींच म्हणून समजावींत.

खुद्द पुरुषाची मनोवृत्ति घेतली तर त्याला कुमारी, आणि तीहि अनुप-भुक्ता, अशीच पत्नी म्हणून पसंत असते. मनाचें औदार्य वाढलें आहे, शरीरसंबंधाचा डाग पार नाहींसा झाला आहे, नीतीच्या कल्पनासुद्धां ढिल्या

झाल्या आहेत, अशा वाटेल तेवढ्या बाष्कळ गप्पा तरुण पिढी मारीना ! पण प्रत्येक तरुणाची महत्त्वाकांक्षा अशीच असते, कीं सद्वर्तनी कुमारिका हीच आपली आदर्श पत्नी होय. जिला पूर्वीचे स्नेही आहेत, अगर जिनें विषय-सुखाचे प्रयोग थोडेफार केलेले आहेत, अशा कुमारिकांशीं लग्न करण्यास कुणीच तयार नसतो. हा मुद्दा कुमारिकांनीं चांगला लक्षांत ठेवावा. स्वैरा-चाराचा क्षणिक धाडसी प्रयत्न तिच्या संसारसुखाची कायमची राखरांगोळी करील, हें त्यांनीं विसरूं नये.

सरसहा स्वैराचार हीच सार्वजनिक नीतिमत्ता अगर कायदेशीर सामाजिक घटना होईतोंपर्यंत स्त्री-पुरुषामध्यें अनन्याविश्वास आणि प्रेम हीं उत्पन्न होण्यासाठीं सामाजिक बंधनें थोड्याफार प्रकाराचीं असणें जरूरीचें आहे. परस्परांनीं वाटेल तितक्या वेळा आणि वाटेल त्याला साक्ष ठेवून घेतलेल्या प्रेमाच्या आणा-शपथा, वैषयिक तृप्तीनंतर शुष्क वाटूं लागतात, पटेनाशा होतात, मोडाव्याशाहि वाटतात. स्त्रीपुरुषसंबंधाला शाश्वति देणारें कोणतेंतरी तत्त्व यांच्या डोळ्यांपुढें सतत तेवत राहिलें तर आणाशपथांची खैरात उधळण्याची जरूरी नसते; विश्वासघात होण्याचीहि शक्यता नसते. जुन्या काळीं मोक्षाची आशा, धर्माची आज्ञा, रूढीची प्रतिष्ठा, या आपापल्या प्रकारें स्त्री-पुरुषांना वैवाहिक जीवनाच्या कोंड-वाड्यांत कायमच्या कोंडून ठेवीत आणि त्यांतच त्यांना सवयीनें सुख वाटे. तो सर्व प्रकार वेडगळ, बुद्धिहीन म्हणून टाकून देण्यास आपण तयार झालें; तरी कांहींतरी निश्चित अशा कायमच्या ऋणानुबंधांनीं स्त्री-पुरुषांनीं एकत्र राहणें हें उभयतांच्या सुखाच्या व संततीच्या संरक्षणाच्या दृष्टीनें जरूरीचें आहे. मग ती क्वचितच आढळून येणारी कर्तव्यनिष्ठा असो, अगर स्वतःच्या सुखाची आणि मानववंशाच्या सुष्टतेची आस्था असो.

वैषयिक संबंध केवळ वैयक्तिक ऋणानुबंध नसतात; सर्व समाजाचें हिता-हित त्यांत सामावलेलें असतें. शेंकडों वर्षे अखंड फोंफावत जाणाऱ्या मानव-वंशाचें तेज व आरोग्य ह्यांचीं तीं उगमस्थानें होत. मानववंशाबद्दल क्षिति बाळगली नाहीं तरी स्वतःबद्दल आणि स्वतःच्या अपत्यांबद्दल कांहीं काळजी घेणें जरूर नसतें का ? मानवांचे वैषयिक व्यापार माणुसकीच्याच नरडीला नख लावूं लागले, मानववंशाच्या नसानसांतून सडकें रक्त आणि कुजकी नीतिमत्ता कोंबूं लागलें, खुद्द त्या माणसांच्याच बौद्धिक वा शारीरिक

आरोग्याचा व समाधानाचा नायनाट उडवून देऊं लागले, तर या व्यक्ति-स्वातंत्र्याच्या धामधुमीच्या काळांतहि त्यांना कोणत्या ना कोणत्या तरी नियमांचा जेरबंद लावावा लागेल. स्वैराचार चांगला कीं वाईट हें त्याच्यापासून उत्पन्न होणाऱ्या परिणामावरून ठरवावें लागेल. व्यक्तीच्या दृष्टीनें पाहिलें तर स्वैराचार व्यक्तीला—विशेषतः स्त्रीजातीला—धुळीस मिळवितो. समाजाच्या दृष्टीनें पाहतां स्वैराचार समाजाची म्हणजे पर्यायानें व्यक्तीचीहि धुळधाण उडवितो.

हें सर्व लक्षांत घेऊन मग स्वैराचाराचा उदोउदो करावा. उघड्या डोळ्यांनीं आगींत उडी घेणाऱ्यांना पश्चात्तापाचें तरी दुःख होत नाहीं, होऊंहि नये. पण अशीं धाडसी माणसें फारच थोडीं ! आगींत उडी टाकणारे बहुतेक पतंग दिव्याच्या तेजानें आंधळे झालेले असतात; कामुकतेच्या निकडीनें अंध झालेले असतात ! ! कामुकतेच्या निकडीनें अंध झालेले हे पतंग आत्मनाश करून घेत असतात ! ! !

---

## सुशिक्षित कुमारिकांचा प्रश्न : : ३

ह्यातांतून संधि एकदां निसटली म्हणजे ती कायमचीच असते. अनुकूल संधि ही तरी अनेक अनुकूल घटनांची मिळून झालेली एक योजना असते. त्या सर्व घटना पुन्हा त्याच ठिकाणीं आणि त्याच त्या स्वरूपांत एकत्र येणें हें कठीण असतें. अगदीं दैववाद घेतला तरी यशस्वी माणसालाहि दैवानें कांहीं कमी हुलकावण्या दाखविलेल्या नसतात. कपाळकरंट्या माणसाला तर आशेचें मृगजळ जन्मभर धांपा टाकावयाला लावतें. त्या संधीचा फायदा त्यानें घेतला नाहीं म्हणून तो कपाळकरंटा राहिला, का तो कपाळकरंटा म्हणून त्याला त्या सुसंधीचा फायदा घेण्याची बुद्धि झाली नाहीं, हें एक दैववादालाहि न सुटणारें कोडेंच आहे. प्रौढ कुमारिकांचा– विशेषतः सुशील, सुशिक्षित, अति प्रौढ कुमारिकांचा– प्रश्न हाहि पण असाच एक सामाजिक कूट प्रश्न होऊन राहिला आहे. लग्नाची आलेली योग्य संधि आपण होऊन घालविली म्हणून त्या अविवाहित राहिल्या, का त्यांच्या चिकित्सक महत्त्वाकांक्षेला योग्य संधीच दिसली नाहीं म्हणून त्या एवढीं वयें होईतोंवर अविवाहित राहिल्या याचा निर्णय ज्या त्या कुमारिकाहि देऊं शकणार नाहींत. विवाहाचा प्रश्न न

सुटणारा म्हणून त्यांच्यापैकीं बऱ्याच जणींनीं तों कायमचाच सोडून दिलेला असतो. पण अविवाहित कुमारिकांच्या वाढत्या संख्येनें एकसारखा पुढें टाकलेला प्रश्न समाजाला दृष्टिआड करतां येत नाहीं. अविवाहित राहणारी मंडळी– मग ती पुरुष असोत कीं स्त्री असोत– समाजाच्या स्थैर्याच्या व स्वास्थ्याच्या दृष्टीनें अनिष्टच होत. संसारसुखाची आशा नाहीं, धडाडीचें आयुष्य घालविण्याची ईर्षा नाहीं, म्हातारपणीं मुलांबाळांचा आधार मिळण्याची आशा नाहीं, आणि आपल्या पश्चात् आपलें नांव, कीर्ति आणि संपत्ति कोणी पुढें चालवील असा संभव नाहीं, असले हे निराशेनें बेहोष झालेले जीव, एक निराशेचें कोंदट वातावरण तरी समाजांत निर्माण करतील, नाहीं तर दुराचाराची धुळवड खेळून संभावित जीवनाला राजरोसपणें वावरूं देणें अशक्य करतील. येवढे दूरवरचे अनिष्ट परिणाम लक्षांत घेतले म्हणजे अविवाहितांचा प्रश्न सोडविण्यासाठीं समाज येवढा कासावीस कां होऊन राहिला आहे, याचें इंगित सहज समजेल.

मुलींचीं लग्नाचीं वयें एकसारखीं वाढूं लागलीं आहेत, हा कालानें बालविवाहाच्या रूढीवर मिळविलेला विजय होय. तथापि प्रौढ कुमारिकांच्या तोंडाला संसारसुखाचीं पानें कायमचीं पुसून रूढीनें आपल्या परीं सुधारणेवर सूड उगविण्याचाच सपाटा चालविलेला आहे कीं काय न कळे! बरें, हीं लग्नाचीं वयें वाढतात तीं तरी हेतुपुरस्सर वाढविलेलीं असतात का? वयाच्या अमुक एका वर्षीं मुलीचें लग्न करावयाचें अशी मर्यादा कोणत्या पालकाला आपल्या मनाशीं ठरवितां येते? ती अमलांत आणतां येते? सोळा वर्षांच्या आंतील मुलीला कोणी पत्करीतच नाहीं, म्हणून सोळा वर्षांच्या आंत मुलीच्या वडिलांना तिचें लग्न करणें अशक्यच असतें. पण सोळा वर्षांच्या नंतर अविवाहित मुलींचीं जीं लग्नाचीं वयें वाढतात तीं अनेक कारणांनीं वाढत असतात. मुलींची शिकण्याची उमेद व लायकी आणि पालकांची हौस व पैसा ह्यांच्या कमीजास्त प्रमाणावर तिचा शिक्षणक्रम पुरा होणें कीं अगोदर लग्न होणें हें अवलंबून असतें. जसजशी ती शिक्षणक्रमांतील एकेक परीक्षा पास होऊं लागते तसतशी तिची व तिच्या पालकांची तिचा शिक्षणक्रम पुरा झाल्यानंतर लग्न करण्याची इच्छा प्रबळ होऊं लागते.

तिचा हा शिक्षणक्रम पुरा झाला, कीं ती लग्नाला अधिक योग्य होईल, ती अधिक पसंत पडेल, अगर संसारशास्त्रांत ती अधिक कुशल होईल, अशांतला

मुळींच भाग नसतो. लग्न न करतांच तिनें आजन्म अविवाहित राहवें, अशी इच्छा एकाहि आईबापाची नसते. शिक्षण पुरें झाल्यानंतर तिनें लग्न करावें आणि मिळालेल्या शिक्षणाच्या जोरावर अधिक सुखानें संसार करावा हीच शिक्षण देणाऱ्या पालकांची तिच्याबद्दलची अपेक्षा असते. खुद्द कुमारिकेची मनीषा अशीच असते. एवंच, मुलींना शिक्षण द्यावयाचें त्याचा आणि लग्नाचा अर्थाअर्थी संबंध नसतो. जर थोडाफार असलाच तर तो अत्यंत क्षीण. वधूपसंतीच्या परीक्षेंत शिक्षण हा एक ऐच्छिक आणि वेळीं दुसऱ्या जरूरीच्या गुणांतील उणेपणा भरून काढणारा गुण, शिक्षण पुरें झाल्यावर लग्न करूं हा कार्यक्रम हुशार मुलींच्या आईबापांना सारखा भुरळ टाकीत असतो. मुलीची हुशारी अर्ध्याच शिक्षणक्रमांत खुडावी, तिच्या वाढत्या व्यक्तिमत्वाची फोंफावणारी वाढ ऐन वेळीं छाटावी, तिच्या प्रेमळ आणि सोज्वळ संगतीला इतक्या लवकर पारखें व्हावें, असें हौशी आईबापांना कसें वाटेल? तिचा शिक्षणक्रम पुरा होईतोंवर तिच्या वयाच्या मानानें तिला योग्य अशा तरुणांचीं लग्नें अगोदरच होऊन जातात. वधू आणि वर यांच्यांत दोनपासून सात वर्षांपावेतों अंतर असावें, हें कोष्टक लक्षांत घेतां, हिचें शिक्षण पुरें होण्याच्या सुमारास तिला वयानें योग्य असे अविवाहित नवरे मुलगे शिल्लक राहणें फारसें संभवत नाहीं.

सध्यांच्या आर्थिक ओढाताणीनें लग्नाला बाजारी स्वरूप आणून दिलें. पण त्या बाजारांतहि पदवीधर कुमारिका ह्या बहुमोल असूनहि कवडीमोल ठरतात. ऐरावत हें थोर रत्न; पण तें फुकट मिळालें तरी पोसणें राजेरजवाड्यांचेंच काम! बहुंशीं बेकार व अंशतः अत्यल्प वेतन कमावणारा आजचा तरुण स्वतःचेंच पोट जेमतेम भरतो; त्याला पदवीधर बायको ही अगदीं ऐरावताप्रमाणें न पोसतां येणारी जड देणगी वाटते. तरुणांना आपल्या बरोबरीची शिकलेली तरुणी नको असते. उलट आपल्या ओझेंत राहील अशी कमी शिकलेली, स्वरूपानें सुंदर आणि पैशानें मातबर, अशी पत्नी हवी असते, असाहि लोकापवाद त्यांच्यावर लादण्यांत येतो. पण त्याहिपेक्षां तरुणांच्या मनाचें औदार्य हेंच त्यांना बरोबरीच्या पदवीधर तरुणीस पत्नी म्हणून निवडण्याच्या आड येतें. त्यालाहि मनांतून तिच्या संस्कारी सोबतीची, बरोबरीच्या मैत्रीची तितकीच हौस असते. पण आपल्याशीं लग्न

लावल्यानें तिला काबाडकष्ट करावे लागतील, आणि असे काबाडकष्ट तिच्यासारख्या विदुषीला करावयास लावणें हा अधमपणा होय, अशा कांहींशा संकोचाच्या, औदार्याच्या, भीतीच्या आणि ओशाळेपणाच्या भावनेनेंच तो तिला पत्करण्यास तयार नसतो. आजचा लग्नाचा बाजार पाहिला तर मुलाचें काय अगर मुलीचें काय, शिकत असतांना लग्न लवकर जमतें. मुलगा पदवीधर झाला आणि तो बेकार राहिला तर त्याची किंमत कवडीमोल ठरते. मुलगी पदवीधर झाली, कीं बहुमोल ठरतेहि; पण त्या बहुमोल व्यक्तीस संसारांतली मैत्रीण म्हणून घेऊन जाण्यास कोणत्याच तरुणाचा हात पुढें सरसावत नाहीं. शिकलेल्या मुली खर्चिक असतात, आळशी असतात, घरकामांत परावलंबी असतात, सांसारिक गोष्टींत हट्टी असतात, असले खरेखोटे प्रवाद गेल्या पिढींतील आडदांड, गर्विष्ठ, आळशी पण भाग्यशाली विदुषींनीं जे प्रस्थापित केले, ते आजच्या कुमारिकांचाहि पाठलाग करून लौकिक घालवीत आहेत. आजची शिकणारी कुमारिका ही तरी आर्थिक अडचणीच्या जात्यांत भरडल्या जाणाऱ्या कुटुंबांतीलच असते. नोकरचाकरांच्या अशक्यतेमुळें घरकामांत तरबेज राहते आणि मर्यादित महत्त्वाकांक्षाच उराशीं बाळगते; तेव्हां त्यांच्या उद्योगशीलतेबद्दल, कर्तबगारीबद्दल, आणि काटकसरीबद्दल भलत्याच गैरसमजुती समाजानें करून घेतल्या आहेत, अहोरात्र करीत आहे.

शिक्षण पुरें होतांच आईबापांनाहि मुलगी अगदीं बरोबरीची आणि आपल्याइतकीच कर्तबगार अशी वाटूं लागते. त्यांतून तिच्या लग्नाची खटपट करून रंजीस आलेले आईबाप असेंच मनांतून म्हणत असतात, कीं ही आतां प्रौढ झाली आहे, हिचें हिनें लग्नाचें जमवावें. असेंच म्हणानात, कीं पदवीधर मुलीचे आईबाप हे तिच्या लग्नाची बाबत हळूहळू अंगाबाहेरच टाकूं लागतात. स्वतःस मिळालेल्या महत्त्वाच्या कल्पनेनें कुमारिकाहि बऱ्याच वेळीं शेफारून जाते, वरपसंतीच्या भरमसाट अटी बरळूं लागते, हट्टीपणाची भाषा बोलूं लागते आणि संसारांत न जमलें तर स्वतंत्रपणें राहण्याची दहशतहि घालते. मुलीचें मन स्पष्ट जाणल्यावर तिच्या लग्नाच्या भानगडींत पडण्यास वडील मंडळी पुढें पुढें धजेनाशींच होतात. कुमारिकेच्या मनांत मिळविलेल्या शिक्षणाबद्दल, त्याच्या किंमतीबद्दल आणि त्याच्या जोरावर स्वतंत्र जीविताचा चरितार्थ चालविण्याच्या कार्यक्रमाबद्दल, भलत्याच कल्पना घोळूं लागतात. त्यांतून तिच्या सभोंवारचे

संसार तिला इतके जिकिरीचे, कष्टी आणि हीन दिसूं लागतात, कीं लग्नाचा मोह तिला पुढें पुढें पडेनासा होतो. खरोखर पाहिलें तर आपले संसार अत्यंत नीरस, कष्टी आणि बेचव आहेतच. तिला त्या संसारांत आपल्या व्यक्तिमत्वाचा जरूर कोंडमारा होणार असें वाटूं लागतें. म्हणून ती अविवाहित राहते, का योग्य असा सोबती तिला दिसत नाहीं म्हणून ती अविवाहित राहते, हें एकट्या तिचें तिलाच माहीत! पण एवढें खरें, कीं तिला स्वतंत्र जीवन कंठण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न होते. शिक्षणक्रमांत ज्याप्रमाणें आपण लागोपाठ यशाच्या पायऱ्यां भराभर चढत गेलों, त्याच धूमठोक दौडीनें यशस्वी स्वतंत्र जीवनाचे टप्पे आपण सहज गाठूं असें तिला वाटूं लागतें; मग ती मास्तरीण असो कीं डॉक्टरीण असो. ती पहिल्यानें कांहीं दिवस आपल्या धंद्यांत इतकी एकतान होऊन जाते, कीं ती पोटाची भूकतहान विसरते.

तेव्हां अशा त्या एकाग्र सेवेंत भावनांच्या अनेक भुका तिला कशा आठवणार? तिच्या त्या निरलस कसून श्रमांचें चीजहि होतें. तिनें हातीं घेतलेलें कार्य सफल होतें. तिची बोलबोलाहि होते. पण आपण शतकृत्य झालों असें तिला ज्या क्षणीं वाटतें त्या क्षणींच "आतां पुढें काय?" असा उदास प्रश्न तिला तिचें उजाड झालेलें मन विचारतें व त्या क्षणींच ती एकदम खचतेहि. अशा कार्यांतून ती मोकळी झाल्ली पाहतांच मारलेल्या सर्व भुका तिला फाडफाडून घेतात आणि ती मनानें आणि शरिरानें अगदीं खचून जाते. व्यक्तिविकास ही अगदीं निसर्गानें प्राणिमात्राच्या रोमरोमांतरीं एक नैसर्गिक महत्त्वाकांक्षा पेरून ठेवलेली आहे. हा व्यक्तिविकास विजातीयांच्या सोबतीनें आणि सोबतींत पुरा व्हावा अशी योजनाहि त्याचबरोबर निसर्गानें केलेली आहे. तेव्हां एकट्या व्यक्तीचा आत्मविकास साधणार कसा आणि समाधान देणार कसा? स्त्रीची प्रवृत्ति ही दुसऱ्याच्या आश्रयासाठीं हपापलेली असते. तिच्या कर्तबगारीचें कार्यक्षेत्र निराळें असलें तरी तिला स्वतंत्रपणें अस्तित्व नसतें, तसें तें अस्तित्व फार वेळ टिकवितांहि येत नाहीं. कुमारिकांनीं अंगिकारलेल्या कार्याचा परमोत्कर्षबिंदु हाच त्यांच्या भावनांच्या अपकर्षाचा उदयबिंदु होय.

लग्नाची वेळ निघून गेल्यानें हताश झालेल्या, क्षुधांच्या निरोधनानें निस्तेज झालेल्या, निराशामय जीवनानें उदास दिसणाऱ्या, अतिप्रौढ कुमारिका लग्नासाठीं अगदीं कासावीस होतात, असें दृश्य ठायीं ठायीं दिसून येते.

आणि अशा कुमारिकेनें कासावीस न व्हावें तर काय? पस्तिशीच्या सुमारास मातृपदाचा संभव बंद होतो. स्त्रियांच्या मनांत पतिप्रेमाइतकीच वात्सल्य प्रेमाची भूक प्रखरतेनें नांदत असते. पत्नी झाल्याशिवाय तिला जसें वैषयिक समाधान लाभत नाहीं, तशी माता झाल्याशिवाय तिची संसारी महत्त्वाकांक्षा पुरी होत नाहीं. स्त्री ही प्रामुख्यानें माता आहे. ही मातृपदाची भूक–अपत्याचें संगोपन करण्याची हौस–यापरती दुसरी महत्त्वाची कोणतीच आकांक्षा त्यांच्या ठायीं वसत नसते. अशा त्या जिह्वाळयाच्या मातृपदाच्या प्राप्तीसाठीं अतिप्रौढ कुमारिका कासावीस होत असतील तर नवल नाहीं. पस्तिशीपर्यंतचा सगळा एकंदर संसार! त्यांतून शिकण्यासवरण्यांत, स्वतंत्र जीवन कंठण्यांत, वायां दवडलेलीं वर्षें वजा करतां त्यांच्या हातीं ४–२ वर्षांचाच मातृपदाच्या आशेचा काल शिल्लक राहिलेला असतो, आणि तेवढ्या काळांत मातृपद हस्तगत करण्यासाठीं त्या कासावीस झालेल्या असतात.

पूर्वीच्या वरपसंतीच्या सर्व अटी त्यांनीं ह्यापूर्वीच हातावेगळया केलेल्या असतात; इतकेंच नव्हे तर, लहानपणीं लग्न झालें असतांना जी परिस्थिति आणि जशा प्रकारचा नवरा त्यांनीं पत्करला नसता अशी विपरीत परिस्थिति आणि असा त्याज्य वर त्या एकदम पसंत करतात. प्रौढ कुमारिकांच्या नशिबीं बिजवरच असावयाचा आणि तोहि इतक्या मोठ्या वयाचा, कीं वयाच्या अंतरापुरता तरी त्यांचा निखालस बिजोडाच दिसावा! विदुषींना सामाजिक प्रतिष्ठेची अधिकच मातब्बरी वाटूं लागते. उभयतांच्या वयांतील अंतराकडे, पहिल्या मुलांबाळांकडे, नवऱ्याच्या खंगलेल्या प्रवृत्तीकडे आणि खचत जाणाऱ्या शरीराकडे जाणूनबुजून त्या डोळेझांक करतात. अशांच्या पदरीं संसारसुखाचा कितीसा वांटा पडत असेल हें जिचें तिलाच माहिती! लग्नाच्या वयांत आपण तोऱ्यानें वागलें, अनेक अनुरूप वरांना वरण्याचें नाकारलें, त्याची शिक्षा म्हणून उष्टा आणि उजाड झालेला संसार पुढें चालविणें आपल्या नशिबीं आलें, असें त्यांतील बऱ्याच जणींना वाटल्यावांचून राहात नाहीं. एकलकोंड्या कुवारपणांत सुख मिळालें नाहीं, प्रौढपणींच्या उष्ट्या संसारांत सुख शिल्लक राहिलें नाहीं, अशी त्यांची जन्मभर या ना त्या प्रकारें मानवी आकांक्षांची उपासमारी होत असते. बऱ्याचजणी आपली निराशा प्रकट होऊं न देतां अविवाहित स्थितींत अखंड राहतील अगर विवाहित स्थितींत बाहेरून समाधानी दिसतील;

तथापि त्यांचा तो बळेंच आणलेला आनंद त्यांच्या मनाची केविलवाणी स्थितीच दुसऱ्यांच्या नजरेस आणून देतो.

शिकलेल्या आणि कमावत्या कुमारिकांना त्यांची वडीलधारी आणि भोंवतालची मंडळी त्यांनीं असलेला नोकरीपेशाच चालू ठेवावा असेंच प्रोत्साहन देत असतात. पैशाचें व्यसन हेंहि इतर व्यसनांप्रमाणें नित्य परिपाठानें जडतें व जडल्यावर सोडणें 'अशक्य होतें.' तिच्या कमाईवर अवलंबून राहणाऱ्या मंडळींना लोभाचें व्यसन जडतें व तिची ती प्राप्ती बंद व्हावी ही कल्पनाहि असह्य वाटते. आजवर शिक्षणाकरितां खर्च केलेल्या पैशाची परतफेड केली पाहिजे, असा निष्ठुर हट्ट क्रूर आईबाप बोलून दाखवितील, तर कुटुंबाच्या आर्थिक आणीबाणीच्या वेळीं (आणि हे आणीबाणीचे पेचप्रसंग वर्षानुवर्ष चालणारे असतात) तिनें स्वतःच्या कमाईतून वृद्ध आईबाप, घरीं आलेल्या बहिणीचें कुटुंब, भावाचा उघडा पडलेला संसार, यांचें पोषण चालविण्यासाठीं, लहान बहिणींचीं लग्नें आणि भावाच्या शिक्षणासाठीं, द्रव्याची मदत तिनें केली पाहिजे आणि ही द्रव्याची मदत तिनें अविवाहित राहून सतत करीत राहणें, हीच आयुष्याची इतिकर्तव्यता होय, असे शब्द तिच्या कानींकपाळीं पडत असतात. तिला त्यांच्या त्या मानभावी स्वार्थी विनवण्या खऱ्या वाटल्या नाहींत, तरी आपल्या एकट्याच्या सुखासाठीं इतक्या जणांचीं मनें दुखविणें तिच्या जिवावर येतें. यच्चयावत् नातेवाइकांच्या या निलाजऱ्या स्वार्थी लांडगेतोडीनें ती चिडून जाऊन स्वतःचा स्वार्थ त्यांच्या तोंडावर फेंकते आणि तेहि तिच्या स्वार्थाच्या चिंध्याचिंध्या करून; तिला परमार्थाशिवाय दुसरें जीवनच ते शिल्लक ठेवीत नाहींत. स्त्री जात ही अत्यंत भावनाशील. ह्या भावनाशीलतेमुळें घरोघर आकर्षक संसार मांडले गेले, त्यांतील दुःखी, कष्टी, रोगी, अल्पवयी जिवांचें पालनपोषण होत असतें हें खरें; तथापि ह्याच भावनेच्या अतिरेकानें स्त्रिया स्वतःच्या स्वार्थाची, शरिराची आणि सुखाची राखरांगोळी करतात. स्थिति अशी होते, कीं कुटुंबांतील लहानमोठ्या, म्हाताऱ्या-कोताऱ्यांसुद्धां, सर्व माणसांचे प्रपंच ज्याच्या त्याच्या परीनें यथास्थित चालत असतात. जो तो आपापल्या प्रपंचांत पुरा गढून गेलेला असतो. सगळ्या कुटुंबांत कष्टी आणि कष्ट करणारी अशी हीच एकटी आणि कमावती कुमारिका! तिनें सर्वांच्या सुखासाठीं धावावें; पण तिला शरीरक्लेश अगर मनःक्लेश होऊं लागले तर तिच्या मदतीला कोणीच

धावून येऊं नये! सर्व घरांत आपणांबद्दल काळजी वाहणारें कुणी नसावें,' ही जाणीव, जसजसें तिचें वय वाढत जातें तसतशी तिला अधिकाअधिक होऊं लागते. पण त्याचा तिला काय उपयोग? आणि या वेळीं वय आणि हुरूप दोन्हीहि गेल्लीं असतात. धमाधुमीचे संसार उलगडून निवृत्त झालेल्या पोक्त बायकांत ती वयानें जाऊन बसते, तर कधींच संसार मांडण्यास मिळाला नाहीं म्हणून सुखेच्छाच जाळून फस्त केलेल्या विरागी विधवांच्याप्रमाणें तिचा हुरूप आंतून पार खाक झालेला असतो. तिच्या डोक्यांत लग्नाचे विचार आले, तर ते तिचे तिलाहि हास्यास्पद वाटूं लागतात व ते अमलांत आणणेंहि अशक्य भासूं लागतात; म्हणून निमूटपणें ती आपलें आयुष्य तसेंच कंठीत असते. सन्मार्गानें राहण्याबद्दलची इतरांकडून मिळणारी फुकी प्रशंसा तिच्या विझत आलेल्या वैषयिक आकांक्षांना थंड करते. सर्वांच्या उपयोगीं पडल्याबद्दलच्या चांगुलपणाची अफूची गोळी खाऊन ती आपल्या स्वार्थाची तळमळ क्षणैक विसरूं शकते.

ज्या कुमारिका जास्त निर्भीड व धीट असतात त्यांच्याबद्दल शाळा-कॉलेजांत शिकत असतांना उठलेला खोडसाळ लोकापवाद त्यांच्या लग्नाच्या आड नेहमीं येतो. तरुणांच्या साध्यासुध्या मैत्रीचा विपर्यास झाल्याची आणि तिच्या अब्रूच्या चिंध्या झाल्याची गंधवार्ताहि तिला नसते. तिला जर पुढेंमागें त्या अनिष्ट गोष्टी समजल्या, तर ती कायमची हाय खाते; तिचें पुरुषमित्रांशीं बोलणेंचालणें एकदम बंद होतें आणि स्वयंवराचा दरवाजा तिच्यापुरता तरी कायमचा बंद होतो. कांहीं कुमारिकांची विवाहित गृहस्थांशीं दुराचारी मैत्री जमते. असें जेथें घडलें असेल तेथें तिला खरें सुख आणि समाधान लाभणें कठीण असते. कारण भरलेल्या संसारांतून ती पुरुषाला कायमची कधींच उठवूं शकत नाहीं. त्याचाहि ओढा सामाजिक प्रतिष्ठेकडे, पहिल्या पत्नीकडे आणि आपल्या मुलांबाळांकडे सारखा राहणार!

शिकलेल्या कुमारिकांचा प्रश्न हा समाजाला येऊन पडलेला प्रश्न नसून खुद्द कुमारिकांनाहि तो न सुटणारा प्रश्न होऊन बसला आहे. सभोंवारची मंडळी अधिक सहानुभूतीनें जर कुमारिकांकडे पाहतील, त्यांच्या लग्नाच्या बाबतींत जर सतत मदत करीत राहतील, आपला स्वार्थ, खोटा अभिमान, कुटुंबाचा नांवलौकिक आणि तिच्याबद्दलची आपली भरमसाट अपेक्षा हीं जर ती बाजूला

ठेवतील आणि तिच्या व्यक्तिविकासाला, सुखाला आणि स्थैर्याला जेणेंकरून मदत होईल असें वागण्याची खंत बाळगतील, तर शिकलेल्या व शीलवान् कुमारिकांच्या भोंवतीं आज जी अदृश्य बंधनांची गुलामगिरी पसरलेली दिसते ती नाहींशी होईल. घरच्या मंडळींचा पुरा पाठिंबा असेल तरच मनुष्य समाजाच्या अवहेलनेला आणि टीकेला लाथेनें उडवूं शकेल. तसा पाठिंबा कुमारिकांना त्यांच्या आप्तस्वकीयांकडून सतत मिळत राहणें हें अधिक जरूरीचें असतें. कुमारिकांनीं आपले बेत थोडेसे व्यावहारिक मर्यादेत आणावेत, सारासारविचारानें इतरांना पटणाऱ्या आणि स्वतःस साधारणपणें पसंत पडणाऱ्या स्थळांचा स्वीकार करावा. स्वतःचें स्त्रीचें मन पुरें ओळखावें आणि त्या मनांतील आशा पुऱ्या करण्यास जरूर असणाऱ्या सर्व घटनांची अगदीं व्यावहारिकतेनें छाननी करावी व स्वसुखासाठीं थोडीशी चालढकल ठेवून सर्व प्रापंचिक गोष्टींचा स्वीकार करावा. परमार्थासाठीं जन्मभर स्वार्थाची राखरांगोळी करण्याची जरूरी नाहीं हें ओळखावें. ज्या कुमारिका ह्या गोष्टी ओळखतील त्या आपापल्यापुरता तरी हा प्रश्न सोडवतील. कुमारिकाच हा प्रश्न झटपट सोडवूं लागल्या तर तो समाजापुढें प्रश्न म्हणून शिल्लक राहणारहि नाहीं.

---

# अविवाहित माता : : ४

विवाह न होतां मातृपद प्राप्त होणें, ह्यासारखी आपत्ति स्त्रीजीवनांत तरी दुसरी कोणतीच नाहीं. मातृपद प्राप्त होणें हें अगदीं निसर्गाधीन; तथापि खुद्द मातृपद हें कोणत्याहि परिस्थितींत आणि प्रकारें प्राप्त झालें असलें तरी तें जिव्हाळ्याचेंच असतें. लग्नाचा शिक्कामोर्तब—परवाना मिळाल्यानंतर स्त्रीला मातृपद प्राप्त व्हावें अशी नीति कायद्यानें आणि समाजानें ठरविली म्हणून अविवाहित मातृपद हें प्राणसंकट झालें आहे. समाज सुसंघटित झाला, स्वतःच्या स्थैर्यासाठीं, सातत्यासाठीं आणि निर्मळपणासाठीं, त्यानें लग्नसंस्था निर्माण केली, लग्नसंस्थेतून निर्माण होणाऱ्या प्रजेसच वारसाहक्कानें मिळकत मिळण्याचे हक्क दिले, विवाहित स्त्री-पुरुषांच्या प्रेमसंबंधांत ढवळाढवळ करणाऱ्यांना शिक्षा ठरविली, एवढी लग्नसंस्थेभोंवतीं कायद्यानें, रूढीनें, आणि धर्मानें एकावर एक चढविलेली भरभक्कम मजबूत तटबंदी पाहिली, म्हणजे असेंहि वाटतें, कीं समाजांत लग्नसंस्था ही एक आद्य आणि एकमेव स्थायी घटना आहे, कीं जिच्यामुळेंच समाजधारणा होत असते. अशा ह्या आद्यतत्त्वाचा, सर्वसंमत नीतिनियमांचा, सर्वाचरित रूढीचा, उपमर्द करणारें अविवाहित मातृपद! तेव्हां त्यावर

समाजाचा किती रोष असेल हें निराळें सांगणें नकोच. अविवाहित मातृपद त्याज्य वाटतें तें विवाहसंस्थेमुळें! गर्हणीय वाटतें नीतिनियमांमुळें! भयंकर ठरतें तें कायदेशीर परिणामांमुळें! प्राणसंकट होतें रूढीच्या चोंचावण्यामुळें! अतिशय पुढें गेलेलीं पाश्चिमात्य राष्ट्रें घेतलीं, तरी तेथेंहि अविवाहित मातृपद हें प्राण-संकटच समजतात. हें प्राणसंकट टाळण्यासाठीं हजारों कुमारिका आणि लक्षावधि अर्भकें प्राणास मुकतात. आणि ह्या दोन प्रकारच्या मरणांतून कोणाचेंच एकाचें मरण साधतां आलें नाहीं, म्हणून स्वतःच्या कमकुवत मनाला शिव्या-शाप देत, लाजिरवाण्या मुलाला पोटाशीं धरून, जिवंत मरण बऱ्याच कुमारिका सोशीत असतात. लग्नसंस्थेच्या विरुद्ध बाष्कळ युक्तिवाद करणाऱ्यांनीं अविवाहित मातृपदाची भरमसाट कल्पना कितीहि मूर्खपणानें जगापुढें मांडली, तरी ती अजून अमलांत आणण्याचें धैर्य जगांत कोणाला झालें नाहीं व पुढेंहि कित्येक शेंकडों वर्षें होणार नाहीं. आत्यंतिक कल्पना मांडण्यास फारसें धैर्य अगर किंचितहि विद्वत्ता लागत नाहीं. अशीच एक कल्पना अविवाहित ऐच्छिक मातृपदाची होय. पण ज्यांना अविवाहित मातांची समाजांत झालेली दुर्दशा प्रत्यक्ष पाहण्यास मिळाली असेल, अगर त्याची कल्पना करतां येत असेल, त्यांच्या, ह्या महान् संकटाचें भेसूर दृश्य पाहून, अंगावर कांटे आल्याशिवाय राहणार नाहींत.

अविवाहित मातृपद हें कोणी जाणूनबुजून आणि हौसेनें थोडेंच पत्करतें! अगदीं स्वतःची जबाबदारी न समजणाऱ्या लहान पोरीसोरींनाहि त्या आपत्तीची भीति वाटते, तर वयांत आलेली समंजस तरुणी आपण होऊन तें पत्करीत असेल असें मानणें चुकीचें होईल. मग हें अविवाहित मातृपद येतें तरी कसें? त्याचीं कारणें समजल्यास त्याचा यथाशक्ति बंदोबस्त करण्यास ठीक पडेल, ह्यासाठीं थोडींबहुत कारणें सहज नमूद करण्यासारखीं आहेत. पहिलें आणि मुख्य कारण म्हणजे, ही प्रौढविवाहाची अतिरेकाला गेलेली चाल होय. मुलांमुलींचीं लग्नाचीं वयें आपण आर्थिक ओढाताणीमुळें एकसारखीं वाढवीत आलों, तरी निसर्गानें आपल्याशीं कधींच संगनमत केलें नव्हतें. सृष्टिकार्य चालू राहण्यासाठीं, कामुक भावनांचा प्रादुर्भाव होण्याचा काल हा निसर्गानें सरसहा जो ठरवून दिला आहे, त्यांत यत्किंचितहि फेरबदल झालेला नाहीं, होणारहि नाहीं. निसर्ग आपलें काम करीतच असतो. तो रूढीच्या संमतीसाठीं अगर लग्नाच्या

शिक्कामोर्तबासाठीं कधींच ताटकळत उभा राहत नाहीं. मुलींचीं वयें वाढलीं म्हणजे त्यांच्या ठिकाणीं निसर्गसिद्ध आकांक्षाहि उत्पन्न होणार; त्यांना बेहोष करणार, आणि फशीं पाडणार. त्यांतून पुरुषजात ही आपण होऊन पुढाकार घेणारी आणि चढाई करणारी ! त्यामुळें अगदीं नाहीं नाहीं म्हणत असतांहि संकोचानें वा भीतीनें कुमारिका पुरुषांच्या, विशेषतः बेहोष तरुणांच्या, कामुक आक्रमणास बळी पडतात. संततिनियमनाच्या साधनांच्या निर्धास्तपणाचा वाजवीपेक्षां फाजील व खोटा नांवलौकिक झालेला आहे. साधनांच्या निर्धास्त-पणावर विश्वास ठेवून फसलेल्या आणि फसविलेल्या अशाच बहुतेक अविवाहित माता असतात. त्यांचा सौंगडी आणि मैत्रिणी संततिनियमनाच्या साधनांबद्दल शंभर टक्के निर्धास्ततेचीं आश्वासनें देत असतात आणि तिलाहि त्या आश्वा-सनांचा मोठाच आधार वाटत असतो. पुरुषाला स्वैराचार करतांना आपणांस दुसरें कोणी पकडणार तर नाहींना, ही एकच भीति असते. कुमारिकांना आपणांस कोणी पाहत नाहींना ही तर भीति असतेच; शिवाय आपल्या अंगा-वर तर ही बाजू येणार नाहींना ही भीति विशेष असते. पैकीं साधनांच्या साहाय्यांनीं मातृपदाची भीति दूर होण्यासारखी आहे असें समजतांच त्यांना तें धाडस करून पहावेसें वाटतें. लग्नाचीं आश्वासनें देणाऱ्या तरुणांवर विश्वास टाकून त्यांच्या कामुक काकुळतीला बळी पडणाऱ्या कुमारिकाहि कांहीं थोड्या नसतात. अशा संबंधांत गरोदरपणा येण्याच्या अगोदर अगर आल्यानंतर त्याच तरुणाशीं तिचें लग्न झालें तर ह्या तिच्या वैषयिक स्वातंत्र्याच्या अतिरेकाची चर्चाहि होत नाहीं; पण जर का तिचा प्रियकर फसव्या अगर ढोंगी निघाला तर तिला तें संकट निमूटपणें सहन करावें लागतें. नालायक पुरुषावर फाजील विश्वास टाकल्याबद्दल पाठीमागून त्यांना पश्चात्ताप झाला तरी उपयोग काय ! तिला बिघडविणारा ती गरोदर होतांच तिचें नांव टाकून देतो. त्यालाहि आपलें नांव पुढेंमागें गोंवलें जाऊन तिच्याबरोबरच बद्दू होईल याची भीति वाटत असते. फौजदारी गुन्ह्यांत आपण सापडूं ह्याचीहि दहशत असते. आणखीहि अविवाहित माता होण्याचे पेचप्रसंग निर्माण व्हावेत असे प्रसंग येतात. वडील बहिणीच्या बाळंतपणांत मदत करावयास जाणारी वयांत आलेली अविवाहित धाकटी बहीण, दूरच्या ओळखीच्या अगर विधुर नाते-वाइकाच्या येथें विद्याभ्यासासाठीं राहणारी कुमारिका आणि अंदाधुंदी आहे

अशा बदफैली व नादान मोठ्या कुटुंबांत राहणारी कुमारी, यांच्यावर कोणत्या वेळेस काय संकटें ओढवतील, त्यांच्यावर सत्ता गाजविणारीं माणसें आपल्या सत्तेचा केव्हां कसा दुरुपयोग करतील ह्याचा नियम नसतो. अशा पेचप्रसंगांत जबरीनें तिच्यावर लादलें जाणारें मातृपद हें अत्यंत करुणास्पद होय. तशाच प्रकारचें शहारें आणणारें मातृपद गुंडांच्या जोर-जुलूमांतून अगर फसवेगिरींतून निर्माण होतें. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे अविवाहित मातृपद हें फसवणुकी-मुळें, विश्वासघातामुळें, बळजबरीमुळें कुमारिकांच्यावर लादण्यांत येतें. त्यांची ती होणारी फसवणूक संततिनियमनाच्या साधनांच्या वा प्रियकराच्या आश्वासनांच्या खात्रीमुळें झालेली असो; साधनांनीं दगा दिलेला असो वा वचनांनीं तिचा विश्वासघात केलेला असो; तिच्या इच्छेविरुद्ध वा तिच्यावर अंमल गाजविणाऱ्या पुरुषांनीं केलेल्या अत्याचारामुळें तें निर्माण झालेलें असो, सर्वांची एकच दशा ! अविवाहित मातृपद जिचें तिला कधींच हवेंसें वाटलें नव्हतें व वाटत नाहीं.

महान् संकटांत सापडलेल्या त्या कुमारिकेला फसविणाराला तिच्याशीं लग्न लावण्यास भाग पाडून तिच्या उद्धारास मदत करण्याऐवजीं तिच्या अब्रूचें कांबळें अशक्य कंड्यांच्या कांट्यावर घालून त्याच्या चिंध्या चिंध्या करण्या-साठीं टपून बसलेला आमचा निष्ठुर समाज तिच्या रोजच्या हालचालीवर पाळत ठेवील. ती गरोदर असल्याचा व ती गर्भपात करणार असल्याबद्दलचा अगर मूल मारून टाकील असा संभव असल्याबद्दलचा निनांवी अर्ज पोलिसमध्यें नेऊन गुदरण्यास तो कमी करीत नाहीं. आणि पोलिसांचा ससेमिरा एकदां पाठीमागें लागला कीं माणसाला सळो कां पळो होतें. औषधपाणी घेऊन वा शस्त्रक्रिया करून गर्भपात करण्याची अगर स्वतःची सुटका करून घेण्याची कांहींच तजवीज करतां येत नाहीं. तिच्याबद्दलची चर्चा सर्वतोमुखी होऊं लागली कीं गर्भपातावर गुपचूप औषध देणारे वैद्य अगर शस्त्रक्रिया करणारे डॉक्टर तिच्या मदतीस येण्यास तयार नसतात. श्रीमंत लोकांच्या येथें झालेले असले प्रकार फारसे वाढीला लागत नाहींत आणि चव्हाट्यावर तर कधींच येत नाहींत. केव्हांच अशा त्या मुलीचें पोटांतील रोगाबद्दल ऑपरेशन होतें, नाहीं तर ती कुठल्या तरी लांब नातेवाइकांकडे जाऊन चार-आठ महिन्यांनीं हवाफेर तरी करून येते.

वास्तविक पाहतां अशा या फसलेल्या कुमारिकांकडे समाजानें जास्त सहानुभूतीनें पाहिलें पाहिजे. अविवाहित माता या कांहीं जन्मजात कुलटा नव्हत किंवा वेश्याहि नव्हत. त्याहि सर्वसाधारण माणसाइतक्याच सात्त्विक आणि भोळ्या असतात. त्यांच्या हातून जर कांहीं चूक झाली असेल तर ती जास्त विश्वास ठेवल्याची अगर पेचप्रसंगांतून झटकन् निसटून जातां न आल्याची पण ह्या त्यांच्या क्षुल्लक चुकीबद्दल त्यांना शासन तरी किती व्हावें यालाहि कांहीं मर्यादा पाहिजेच. त्यांना आज समाजांतून कायमचें उठवून लावणें अगर आत्महत्या करण्यास भाग पाडणें, ह्या शिक्षा त्यांच्या गुन्ह्याच्या मानानें बेहद्द भारी समजल्या पाहिजेत. अलबत् दुराचारी माणसाला समाजांतून उठवून लावलें पाहिजे, पण अविवाहित माता सरसहा दुराचारी नसतात. त्यांच्या हातून झालेली चूक समाज विसरूं शकला तर त्याहि इतर आपल्या भगिनींप्रमाणें सुखाचे संसार मांडतील. ज्यांचा बभ्रा झाला नाहीं त्या संसार मांडून मानसन्मानांत व आनंदांत दिवस घालवीत आहेतच. समाजाला त्या अनेक प्रकारें उपयोगी पडतील, पडतातहि. समाजांतील मनुष्यबल हें ह्या ना त्या उपायानें जतन करून ठेवलें पाहिजे आणि केवळ कांहीं क्षुल्लक चुकीबद्दल शिक्षा म्हणून आपण जर चांगल्या माणसांना समाजांतून उठवून देऊं लागलों, तर आपलें मनुष्यबल कमी कमी होत जाईल.

अनाथाश्रम ठिकठिकाणीं निघत आहेत, विधवांची व कुमारिकांची बाळंतपणें गुपचूप करीत आहेत, त्यांची लाजीरवाणी प्रजा संभाळण्याचें महत्-कार्य करीत आहेत, अशा वेळीं ज्या दुर्दैवी कुटुंबावर अविवाहित मातृपदाचा दुर्धर प्रसंग कोसळेल त्यांनीं गांगरून जाण्याचें कांहींच कारण नाहीं. ही गोष्ट चारचौघांच्या कानीं होण्याच्या अगोदरच तिची त्या आश्रमांत रवानगी करून तिचें तें ग्रहण सुटलें म्हणजे तिला परत आणावें असें थोड्या शहाणपणानें आणि धीरानें वागलें तरच ती दुर्दैवी कुमारिका प्राणसंकटांतून वांचणार आहे. समाजांतून उठवून लावली जाणारी बिचारी पुन्हा संसारांत बसणार आहे.

कुमारिकांबद्दल वर केलेलें विवेचन विधवांनाहि तंतोतंत लागूं पडणारें असें आहे. अविवाहित माता ह्याचा अर्थ लग्नाचा नवरा नसतांना प्राप्त झालेलें मातृपद हा होय. पुनर्विवाहाच्या प्रश्नाकडे समाज अजूनहि कानाडोळा करीत

आहे आणि विधवांची होणारी कुचंबणा त्यांना कधीं मोहानें, तर कधीं संकटानें अविवाहित मातृपदाच्या आपत्तींत आणून सोडीत आहे.

अविवाहित माता हें समाजाचें लांच्छन आहे. ज्या समाजांतील पुरुष विश्वासघात करूं शकतात, बळजबरी करूं शकतात; आणि समाज अशा फसलेल्या स्त्रीशीं त्यांना लग्न करण्यास भाग पाडूं शकत नाहीं, ह्या त्याच्या पाठीमागें दडून राहणाऱ्या सर्व गोष्टी तितक्याच लाजीरवाण्या होत. अविवाहित मातांना समाजांतून उठविणें म्हणजे खून करणाराला फांशीं न देतां मेलेल्यालाच पुन्हा फांसावर लटकावण्याइतकें चीड आणणारें दुष्कृत्य होय.

---

# एक उपेक्षित सुधारणा : : ५

जरूरीच्या असून ज्या सुधारणा केवळ उपेक्षेनें मागें पडल्या आहेत, अशापैकीं विधवाविवाह ही एक सुधारणा होय. जरूरी पटून लोकांच्या गळीं न उतरणारी अशी दुसरी हट्टी बाबत कोणतीच नाहीं. पूर्वीचे धर्ममार्तंड गेले, त्यांच्याबरोबर आचरट आणि निष्ठुर विरोधहि गेला. आजचे धर्ममार्तंड हे अव्वल इंग्रजींतल्या अट्टल सुधारकांची भाषा बोलत आहेत. पुनर्विवाह अत्यंत आवश्यक आहे ही गोष्ट सर्वमान्य झाली आहे. त्याला कोणाचाहि विरोध नाहीं; असें असतां ही सुधारणा अजून लोकांच्या अंगवळणीं कां पडत नाहीं याचीं कारणें शोधून काढलीं पाहिजेत. विचारांना औदार्य लाभलें, त्यांनीं खूप लांब झेप टाकली, पण समाज त्यांच्या पाठोपाठ उडी घेत नाहीं हें सत्य खरें असलें तरी अभिनंदनीय खास नव्हे.

पुनर्विवाह आणि प्रौढविवाह या दोन सुधारणांचीं रोपटीं एकाच वेळेस जवळजवळ रोवलीं गेलीं. त्यांतले प्रौढविवाहाचें रोपटेंच तेवढें फोंफावलें. सारडा कायद्यानें त्याला खतपाणी व शिक्षेचें काटेरी कुंपण घालून बेफाम वाढण्यास मदत केली; आणि याच रोपट्याच्या सावलीनें पुनर्विवाहाचें रोपटें आज खुरटून गेलेलें

दिसतें. बालविवाहाच्या चालीनें विधवांची संख्या जशी अफाट फुगली होती, तशीच वयस्क कुमारिकांची त्या काळीं अत्यंत टंचाई होती. बालविवाह बंद झाले, विधवांची संख्या कमी झाली खरी; पण पुनर्विवाहाचा प्रश्न मात्र यामुळें फारच मागें पडला. मध्यम वयाच्या गृहस्थाची पहिली बायको निवर्तली तर त्याला मृतपत्नीच्याच वयाची-- शिवाय शिकलेली कुमारिका मिळते तर विधवांकडे तो ढुंकून तरी कशाला पाहील! एका अर्थानें पुनर्विवाहाच्या खऱ्या हितशत्रु जर कोणी असतील तर उपवर झालेल्या मुली, अगर घोडकुमारिका होत.

आर्थिक परिस्थिति पुनर्विवाहाला मदत करण्याऐवजीं विरोधच करते. तें कसें तें पहा. आजची विधवा साधारणपणें इंग्रजी ५।६ यत्ता शिकलेली असते. ती पुढें शिकते, नर्स, मास्तरीण अगर डॉक्टरीण होते, स्वतःचें पोट भागवूं लागते. आणि ज्या स्त्रीला स्वतःच्या हिमतीवर पोट भरण्याची एकदां चटक लागलेली असते, तिला आपलें स्वातंत्र्य गमावण्याचें जिवावर येतें. मनांतून इच्छा असतांहि लग्न करून नवऱ्याच्या ताब्यांत जाण्यास ती तयार होत नाहीं. अजूनहि पुनर्विवाह केल्याबद्दल लोकांचा गैरसमज आणि बायकांचा सामाजिक बहिष्कार विधवेस सोसावा लागतो. असा जाच न होण्यासाठीं पैशाची सुस्थिति असावी लागते. शेंकड्यावारी पगार मिळविणारे पुरुष आपला निराळाच समाज निर्माण करतात. अशांना इतर समाजाबद्दल पर्वा नसते. तेव्हां त्यांनीं पुनर्विवाह केला तर त्यापासून त्यांना स्वतःला अगर त्यांच्या पत्नीला त्रास पोंहोचत नाहीं. अजूनहि पुनर्विवाह ही गोष्ट केवळ आर्थिक परिस्थितीमुळें गरीब माणसांच्या आटोक्याबाहेरची होऊन राहिलेली आहे. कमावत्या विधवाहि अशा गरीब पुरुषांशीं लग्न लावण्यास तयार होत नाहींत. नर्स अगर मास्तरीण म्हणून त्यांचा जो मानाचा दर्जा लोकांत असतो, तो घालवण्यास त्या तयार नसतात. आणि यदाकदाचित् तयार झाल्याच तर मानाच्या भारंभार वैभवाचें दान मिळण्याची त्यांना आशा असेल तर!

वडील मंडळींची जेवढी सहानुभूति पाहिजे तेवढी लाभत नसल्यामुळें लहान पोरीसोरीसुद्धां वैधव्य-दुःखांत सर्व आयुष्य निमूटपणें कंठीत असतात. मुलीनें अगर सुनेनें पुनर्विवाह केल्यास हरकत नाहीं, असें वरवर म्हणणाऱ्या माणसांच्या उद्गारांतहि पुनर्विवाह न केल्लाच बरा असाच दुसरा सूर निघत असतो. वडील मंडळींनीं खटपट करून मुलीसुनांचे पुनर्विवाह घडवून आणल्याचे दाखले

सापडत नाहींत, हीच एक गोष्ट या बाबतींत साक्ष देण्यास पुरेशी आहे. वडील मंडळी आपली सामाजिक प्रतिष्ठा कायम ठेवण्याबद्दल जास्त दक्ष असतात आणि नशिबाला हात लावून पाणी गाळीत दिवस काढण्याचें वडीलधाऱ्या स्त्रियांच्या तोंडून निघणारें बायकी तत्त्वज्ञान, तिच्या कानांवर एकसारखें आदळत असतें. वडील मंडळी उदासीन, नव्हे प्रत्यक्षपणें वा अप्रत्यक्षपणें विरोध करणारी; व तरुणांची दृष्टीहि तिच्याकडे वळत नाहीं, अशा स्थितींत सापडलेली आजची विधवा धीटपणानें स्वतःचा पुनर्विवाह घडवून आणील ही आशाच धरणें व्यर्थ होय. हल्लीं कोणत्याहि विधवेचे अगदीं एकांतांत पुनर्विवाह करावा असे विचार नक्की होत असले, तरी ते विचार अंमलांत आणणें म्हणजे आप्तस्वकीयांचा आधार स्वतःच्या हातानें तोडून टाकणें होय, हें दृश्य जोंवर विधवेच्या डोळ्यांपुढें आहे तोंवर धीरानें तिच्या हातून कोणतीच गोष्ट होणें शक्य नाहीं. सद्विचारांची कुचंबणा केली, त्यांच्या बरोबर राजमार्गानें आणि उजळ माथ्यानें ज्या भावना वावरल्या असत्या त्या भावनांना काल्पनिक भीतीच्या पालपाचोळ्याचा बांध घातला, तरी त्यांचें निरोधन थोडेंच होणार? बांध फोडण्याचें तुफानी सामर्थ्य जिच्या भावनेंत असते, ती लोकनिंदेची पुढें पुढें पर्वाहि करीनाशी होते खरी; पण पुनर्विवाह घडून येण्याचा डाव एकदां हुकला कीं तो कायमचाच असतो. जेथें भावना प्रबळ नसतात तेथेंहि त्या आडमार्गांनीं आणि सांधी-कोपऱ्यांनीं झिरपूं लागतात आणि भलत्याच ठिकाणीं बंधारा फोडून भावना बेफाम वाहूं लागल्या तर मग अशा स्वैरिणीस पुनर्विवाह कायमचाच पारखा होतो. पुनर्विवाह नको, अगर मी करणार नाहीं, अशा म्हणणारणींनींच काय, पण त्याची पोक्त बायकांत बसून टिंगल करणाऱ्या बालविधवांनीं मनांत पक्कें समजावें, कीं विचारांचा ताबा विकारांवर अमुक एका मर्यादेपर्यंत आणि तोहि थोडा वेळच चालूं शकतो. विकारांना दाबून टाकलें पण त्यांनीं उसळी खाल्ली आणि त्यांच्या लोटाबरोबर त्यांनीं तिला वाहून नेलें असें न व्हावें. मानवी प्रकृतीचे जे गुणधर्म आहेत, त्यांचा निरोध करणें अवघड आहे. आणि निरोध केला तरी असें काय दिव्य पदरांत पडतें, कीं ज्यासाठीं भावनांचे तटतटीत उपास आमरण करण्याचें व्रत त्यांनीं स्वीकारावें? पुनर्जन्मावर विश्वास ठेवला, तरी आजची विधवा इतकी दुधखुळी नसेल, कीं जी पुनर्विवाह केल्यानें मृतपति रौरवांत पडेल असें प्रामाणिकपणें

मानील. केवळ शेजाऱ्यापाजाऱ्यांना आवडणार नाहीं म्हणून स्वतःच्या सुखाची राखरांगोळी व अनेकविध क्षुधांची उपासमार त्या करीत असतील तर तो त्यांचा मोठाच वेडेपणा होय.

आर्थिक स्वातंत्र्याचीं साधनें आणि संततिनियमनाचीं निर्धास्त उपकरणें हीं जसजशीं विधवा स्त्रियांच्या हस्तगत होऊं लागलीं आहेत तसतशीं त्यांची पुनर्विवाहाची निकडहि कमी होऊं लागली आहे. ह्याचा अर्थ असा मात्र नव्हे, कीं पुनर्विवाह न करतां राहणाऱ्या विधवा सरसहा दुराचारी असतात. लोकमताच्या दडपणाखालीं चिरडून गेल्यामुळें विकारच काय पण व्यक्तित्व नष्ट झालेल्या, अगर संसारसुखाची ऊब ओळखून त्याबद्दल वीट आलेल्या विधवांचा गट सोडला तरी मनांतून शरीरसुखाकडे ज्यांचा ओढा आहे, त्या ह्या ना त्या मार्गानें तें मिळवितातच आणि वर नमूद केलेलीं साधनें असे चोरून लपून केलेले व्यवहार उघडकीस येऊं देत नाहींत. ह्या साधनांच्या जोरावर कुमारिकाहि लग्नापासून आजन्म दूर राहूं पाहत आहेतच ना ? तेव्हां जी परिस्थिति आज अस्तित्वांत आहे तिचा उल्लेख करणें अपरिहार्य आहे.

आपले संसार हे इतके नीरस, जाचणुकीचे आणि जिकीरीचे झालेले आहेत, कीं समजूतदार स्त्रियांना लग्न करून संसार करण्याबद्दल फारशी आकर्षक उत्सुकता राहिलेली नसते. संसारसुखाबद्दल जबरदस्त कुतूहल असणाऱ्या कुमारिकाहि सप्तपदीचीं पावलें बऱ्याचशा नाइलाजानें, कांहींशा निराशेनें आणि बऱ्याचशा भीतीनेंच टाकतात. तर प्रत्यक्षच वैवाहिक जीवनाच्या कटु अनुभवाचे चटके घेऊन भाजून निघालेल्या विधवा पुन्हा संसारांत पडण्यास नाखूष असतील तर नवल नाहीं. पुनर्विवाहापासून पराङ्मुख करणारे नातेवाईक, हेहि केवळ धर्माची आज्ञा, फक्त नीतीचें श्रेष्ठत्व, अगर खास आपली सामाजिक प्रतिष्ठा, ही संभाळण्याकरितां असा उपदेश करतात असें म्हणणेंहि तितकेंसें खरें नाहीं ! नोकराचाकरांच्या अडचणींत आणि वाढत्या आर्थिक दैन्याच्या खाईत सापडलेलीं आजचीं पांढरपेशा वर्गातील कुटुंबें केवळ पोटापाण्यावारी चोवीस तास राबणाऱ्या बाया मिळण्याच्या युक्तीकडे किती आतुरतेनें पाहत असतील तें सांगणें नकोच. तशांत कर्त्या पुरुषाचीं मुलेंबाळें संभाळणें, कुटुंबांतील अडगळीवजा पडून राहिलेल्या इसमांचीं कामें करणें, हीं जिकीरीचीं कामें विधवांशिवाय दुसरें कोण करणार !

एवंच, सामाजिक परिस्थिति व खुद्द विधवा, ह्या सर्व पुनर्विवाहाच्या कार्यक्रमास पर्यायानें विरोध करणाऱ्या आहेत. पण ह्यामुळें असें काय साधतें? संसारनौका मोठ्या कुशलतेनें आणि धैर्यानें हाकणाऱ्या किती तरी सुगृहिणी विधवांतून निघतील! तेजस्वी प्रजा प्रसविणाऱ्या किती तरी सुमाता त्यामुळें समाजाला निरुपयोगी होतात! उदासीनपणें आयुष्य कंठणारी व्यक्ति कितीशी मन लावून जगांतील व्यवहार नेकीनें आणि उल्हासानें करील? एवढ्या या प्रचंड कार्यशक्तीचा आपण केवळ अक्षम्य अवहेलनेनें अगर खोट्या भीतीनें नाश करीत आहोंत ह्याची कल्पना कोणाला तरी आहे का? आणि हे असंतुष्ट जीव घरोघर असंतोषाचेंच विष फैलावीत असलेले पाहिले म्हणजे संसारी मनुष्याच्या निर्वेध सुखासाठींसुद्धां दरेक कुटुंबांतील विधवांचे अगदीं अवश्य पुनर्विवाह झाले पाहिजेत, असें म्हणावें लागतें. पाश्चात्य देशांत कुमारिकांपेक्षां विधवांचींच लग्नें लवकर जुळून येतात आणि आपल्याकडील विधवा पाहाव्यात तर स्वतःबद्दल इतक्या बेफिकीर, नव्हे, इतक्या आत्मघातकी असतात, कीं पुनर्विवाहाची त्यांना शक्यताहि पटत नाहीं.

वास्तविक पाहतां थोडाबहुत संसार केलेल्या स्त्रीला पतीची निवड करण्याची जास्त चौकस दृष्टि आलेली असते. फार काय, पण पसंतीच्या वेळीं कोणत्या गोष्टी पुरुषांना आकर्षक दिसतात, आणि कशा वागणुकीनें त्यांचें मन सदैव आपल्या ताब्यांत ठेवतां येतें, ह्याची तिला बरोबर अटकळ साधलेली असते. त्यांनीं जर आपल्या प्रामाणिक विचारांप्रमाणें वागण्याची धिटाई दाखविली तर घोडकुमारिकांच्या स्पर्धेंतहि त्या भराभर आपलीं लग्नें जमवून टाकूं शकतील. ज्या मनाच्या खंबीर असतात, त्या आपलें आयुष्य निर्मळ ठेवूं शकतात. पण ज्या मनाच्या कमकुवत असतात अगर ज्या प्रतिकूल परिस्थितींत सापडलेल्या असतात, त्यांची पुनर्विवाहाच्या अभावीं किती राळ होते ह्याची यादी मनाला उद्वेग आणणारी आहे. महिलाश्रम जेथें जेथें असतील तेथें तेथें ह्या पतितांच्या हकीगती नोंदलेल्या असतातच. शिवाय मुसलमानांच्या हातीं सापडून कायमच्या त्यांच्या ताब्यांत राहणाऱ्या व समाजानें निष्ठुरतेनें लोटून दिलेल्या, अशा पतित विधवांची संख्याहि अफाट सापडेल. हा समाज-संख्येचा ऱ्हास, हा कार्यशक्तीचा डोळ्यांदेखत होणारा नाश, थांबविणें असेल तर पुनर्विवाहाबद्दलची आपली मनःप्रवृत्ति आपण पार बदलली

पाहिजे. हजारों वर्षें पांढरपेशा जातीनें पुनर्विवाहाचा दरवाजा बंद करून असा काय मोक्ष मिळविला आणि खालच्या वर्गानें पुनर्विवाह स्वीकारण्यानें असा काय स्वतःचा नाश करून घेतला ? कोणत्याहि रूढीचा, सामुदायिक हिता-हिताच्या दृष्टीनें विचार झाला पाहिजे, आणि त्या दृष्टीनें पाहतां, ह्या एका अत्यंत महत्त्वाच्या बाबीकडे आपण जाणूनबुजून डोळेझांक चालविली आहे. शहामृगानें वाळूंत डोकें खुपसलें म्हणून तो शत्रूच्या तावडींतून समूळ सुटत नाहीं. तसाच हिंदु समाज ह्या बाबीकडे डोळेझांक करून बसला म्हणजे तो अवनतीच्या हल्ल्यांतून बचावला असें थोडेंच म्हणतां यावयाचें आहे ? जे प्रवाह राजरोस वाहत नाहींत, अगर आपण ज्यांस वाहूं देत नाहीं, ते जमिनीच्या खालून वाहत राहणारच. एखादे वेळीं स्फोट झालाच म्हणजे 'दैवी आपत्ति' म्हणून आपण मोकळे होतों. हे असे स्फोट हजारों वर्षें सांचत आलेल्या अशा अडवलेल्या प्रवाहांचे बांध फुटल्यामुळेंच होत असतात. निसर्गाच्या हातांत स्वतःला सोपून द्यावयाचें आणि त्याच्याबरोबर भल्याबुऱ्या भोंवऱ्यांत सापडून प्राणांतिक गटांगळ्या खात राहावयाचें, ही कर्तबगार मंडळींची विचार-सरणी नसते. कर्तृत्वाबद्दल अभिमान असलेल्या पांढरपेशा समाजाच्या काळजांत या सामाजिक अन्यायाच्या जहरी बाणांचा सल खुपत राहिलेला आहे, तो वेळींच काढून टाकला नाहीं, तर तो त्याचा केव्हां ना केव्हां तरी घात केल्या-शिवाय राहणार नाहीं.

---

## कुजलेला डाव : : ६

सोंगट्यांच्या खेळांत डाव कधींकधीं कुजतो. नेमकें दान पडलें तर दुरंगी होते, नाहीं तर सोंगट्या पुन्हा घरांतून बाहेर निघून भटकूं लागतात, जिंकूं घातलेला डाव उलटतो. असाच प्रकार पांढरपेशा लोकांच्या लग्नासंबंधींचा झाला आहे. मागासलेले व अज्ञानी लोक, यांच्यांत लग्नाच्या बाबतींत अजून फारशा अडचणी उत्पन्न होऊं लागल्या नाहींत. सारडा कायद्यानें मुलमुलींचीं लग्नाचीं वयें थोडींशीं सक्तीनें वाढविलीं खरीं, पण त्या कायद्यानें मागसलेल्या लोकांना लग्नाच्या बाबतींत फारसें नाडलें नाहीं. मुलमुलींचीं वयें थोडीं वाढलीं तरी तीं अशा कांहीं कमाल वयोमर्यादेला आणून ठेवलीं नाहींत, कीं त्या वयोमर्यादेला पोंचल्यामुळें, वज्रलेप झालेल्या स्वभावविशेषांतून निघणाऱ्या बेबनावाच्या ठिणग्या वैवाहिक आयुष्य करपून टाकतील. शिक्षणाच्या अभावीं वधूवरांच्या मनांतील आकांक्षा अगदींच ठेंगण्या आणि आटोक्यांतल्या, आर्थिक परिस्थिति लग्नें घडून येण्याबद्दल अनुकूलहि नाहीं आणि प्रतिकूलहि नाहीं. दरेक स्त्रीपुरुषाचें पोट हातावर, त्यामुळें कोणी कोणासच जड होत नाहीं. मनुष्यसंख्येनें त्या कुटुंबास खरोखरचें मनुष्यबल लाभतें, त्यांच्या कमाईचे मार्ग

आणि साधनें वाढतात. शेतकऱ्याच्या येथें सून आली, तर एक तोंड खाणारें वाढलें खरें, पण नुसत्या अन्नवस्त्रावर चोवीस तास राबणारें घरचें माणूस मिळतें तें ! म्हणून सुधारलेल्या अगर पांढरपेशा जातींच्या मानानें मागसलेल्या जातींतील लग्नें अजून सहजासहजीं होणारीं व सुखकारक अशीं आढळतात.

पांढरपेशा जातीनें मात्र मुलमुलींचीं वयें वाढवून त्यांच्या आवडीनिवडी वज्रलेप करून टाकल्या, त्यांना शिक्षण देऊन त्यांचीं मनें संस्कारी केलीं आणि आकांक्षा वाढविल्या, आणि सर्व जीवन म्हणजे आर्थिक परिस्थितीच्या तारेवरचा नाच ठरवून एका मोठ्या जिव्हाळ्याच्या बाबतींत अनंत अडचणी उत्पन्न केल्या आहेत. आवडी-निवडी नक्की झाल्यानें वधूवर-पसंतीचा फार्स कधीं संपतच नाहीं. फार्स अशाकरितां म्हणतों कीं, अनोळखी गांवाहून येणाऱ्या व्यक्तीला चारदोन मिनिटें पाहणें आणि पसंत करणें हा नुसता फार्सच नव्हे तर मनाची निव्वळ फसवणूक आहे! उभयतांच्या आवडी-नावडी न बदलतां येणाऱ्या साच्यांत अगदीं लोखंडाच्या रसानें ओतून काढलेल्या असतात; तेव्हां त्या एकमेकांशीं जुळतील असा जसा नेम नसतो तसाच त्या एकमेकांपुढें नमतें घेतील अशीहि खात्री नसते. तांब्याचीं दोन भांडीं एकावर एक आपटत राहिलीं म्हणजे कायमचे बेबनावाचे ध्वनि त्यांतून निघतच राहणार. शिक्षणानें मनें संस्कारी बनलीं. शारीरिक गरजांहून अधिक उच्च अशा बौद्धिक स्नेहाच्या, समाधानाच्या आणि आनंदाच्या ज्या आकांक्षा तरुण मंडळींच्या संस्कारी मनांत वावरत असतात, त्या अपेक्षांस उतरेल असा सहचर अगर सहचारिणी मिळणें दिवसेंदिवस दुरापास्त झालें आहे. आवडी-निवडी आणि आकांक्षा या अशा अस्पष्ट अदृश्य गोष्टी असतात कीं, ज्याच्या त्यालाहि त्या स्पष्ट शब्दांत व्यक्त करतां येत नाहींत. तेव्हां समान गुणधर्मांची मंडळी निवडून काढणें नेहमींच कठीण असते. अनोळखी स्त्री-पुरुषांची, लग्नाच्या निमित्तानें आणि लग्नाच्या दिवशीं, पहिलीच भेट घडविणारी आजची आमची लग्नपद्धति विवाहोत्सुकांच्या आकांक्षा, आवडी-निवडी, यांची कधीं पर्वाच करीत नाहीं.

मध्यम वर्ग हा जेमतेम तोल संभाळीत कसें तरी जिकीरीचें आर्थिक जीवन कंठीत आहे. कमावणारे एक आणि खाणारे दहा, तेव्हां त्यांची काय दैना विचारतां ! फार श्रीमान् आहेत ते रुपये-आणे-पैच्या किमतीनें माणुसकी

मोजतात. अशा एकंदर परिस्थितींत पुष्कळांना लग्न हें अनिवार्य संकट असें वाटूं लागलें आहे. शरीरधर्म वयापरत्वें वाढीस लागणार; ते कोणास शरीरांतून काढून टाकतां येत नाहींत, विसरतां येत नाहींत. तेवढ्यासाठींच तर स्वतःच्या आवडी-निवडी, आकांक्षा, निराशा, आर्थिक कुचंबणा, या सगळ्या आपत्तींच्या कडकडाटाच्या भीतीनें डोळे घट्ट मिटून घेऊन आमची तरुण गरजू मंडळी गृहस्थाश्रमांत सैरावैरा शिरत आहेत आणि म्हणून सुखोत्पादक व आजवर सर्वसाधारण सुखमय झालेल्या वैवाहिक जीवनाची अलीकडे राळ होऊं लागली आहे. त्यांतून सुखापेक्षां दुःखाचे, आनंदापेक्षां निराशेचे, समाधानापेक्षां असंतोषाचे कड फार जोरजोरानें एकसारखे येत आहेत.

शिक्षणानें वास्तविक हा प्रश्न केव्हांच सोडविला पाहिजे होता. पण परिणाम असा झालेला आढळतो कीं, या अपेशाचा बराचसा वांटा शिक्षणाकडेच जातो. नवऱ्यामुलास मुलगी शिकलेली लागते, याचा अर्थ पुष्कळ शिकलेली अगर पदवीधर झालेली असा नव्हे. अनुभव असा आहे कीं, मुलगी मॅट्रिकच्या वर्गातून जसजशी परीक्षा पास होत जाते, तसतसे तिला पसंत करणारे कमी कमी होत जातात. अगदीं पदवीधर झालेले आणि सुस्थितींत असलेले तरुण कॉलेजांत शिकणाऱ्या अगर बी. ए. झालेल्या मुलींशीं लग्नें करण्यास धजत नाहींत. त्यांना बरोबरीची, शिकलेली बायको नको असते. शिकलेल्या मुलींना गृहकृत्यांत कांहीं समजत नाहीं, ही सबब केवळ पळवाट आहे. तसें असेल तर सुमाता सुगृहिणी अशी गृहितागमा हिच्या लग्नाचा संभव जास्त ठरला पाहिजे. जी. ए. काय अगर बी. ए. काय, या दोघी सारख्याच, आणि यांपैकीं कोणाशींच लग्न करण्यास तरुण कबूल होत नाहींत. आपल्या तोलाची बायको वागविण्याची हिंमत आमच्या तरुणांत नाहीं. तेव्हां त्यांना आपल्या ताब्यांत राहणारी, घरांतील कामधाम करणारी, आणि शारीरिक गरजा भागविणारी अशी कोणी तरी एक स्त्री लागत असते. त्यांच्या बायकोबद्दलच्या आकांक्षा ऐहिकच असेनात का, पण त्याहि फारशा उच्च नसतात. संसाराबद्दलचा आपला दृष्टिकोनच उदास असतो. त्याचें प्रत्यक्ष दृश्य फारसें आकर्षक नसतें. अशा उदासीन आणि कष्टी संसारयात्रेस निघतांना बरोबरीची जोडीदारीण म्हणून जिला ते घेतात, तिनें गृहकृत्यांच्या सर्व जबाबदाऱ्यांचें ओझें डोक्यावर घेऊन यांच्या पाठीमागून

हाकेच्या अंतरावर मुलांबाळांचा परिवार संभाळीत मोलकरणीप्रमाणें चालवें एवढीच त्यांची इच्छा असते.

आयुष्यांत ध्येय नाहीं, सुखाचा संसार करीन अशी हिंमत नाहीं, असा आजचा नेभळट तरुण शिकलेली बायको करण्यास धजणार तरी कसा? वडील मंडळींचाहि रोख शिकलेल्या सुना करण्याच्या विरुद्ध असतो. न शिकलेल्या सासूचा घरांतला अधिकार नाहींसा होईल अशी तिची तिला भीति असते, इतकेंच नव्हे तर, तिच्या नवऱ्यालाहि ती गोष्ट अनिष्टच वाटते. शिकलेल्या बायकोचा इतमाम ठेवला पाहिजे आणि तिचा भारी खर्च चालविणें आपणांस परवडणार नाहीं हीहि भीति तरुणांना वाटतेच. शिकलेल्या मुली खर्चिक, उधळया, छानछोकी, घरच्या गडीमाणसांवर अवलंबून असणाऱ्या, थोडक्यांत म्हणजे ऐषआरामी व ऐदी असतात, अशी समजूत आजच्या तरुणांची झालेली आहे. हत्ती दान मिळाला म्हणून तो घेतला, तरी त्याचा रोजचा खर्च भागविण्याची विवंचना पडते. म्हणून या श्वेत हत्तीचें कन्यादान घेण्यास कोणी धजत नाहीं. शिकणाऱ्या मुलींच्याबद्दल रिकामटेकड्यांनीं ज्या खऱ्याखोट्या कंड्या पिकविलेल्या असतात, त्यांमुळेंहि तरुण त्यांच्याशीं लग्न करण्यास कचरतात. जेथें लग्नाचा बाजार अजून चालतो, तेथें बाजारांतल्या जिनसांप्रमाणेंच वरवर पाहून जास्त फायद्याची, अश्राप, भित्री, स्वतःच्या ताब्यांत राहणारी, अशीच पत्नी शेवटीं तो निवडून काढतो.

शिकणाऱ्या मुलीहि त्यांच्याबद्दल असलेल्या अपेक्षेप्रमाणें अजून उतरत नाहींत. आय्. सी. एस्. नवऱ्याच्या मृगजळासाठीं धापा टाकीत आयुष्य दवडणाऱ्या हरिणाक्षीहि कांहीं कांहीं कमी नसतात. आय्. सी. एस्. नच मिळाल्यास परदेशांत जाऊन आलेला मोठा पगारदार, तोहि न मिळाला तर सुशिक्षित आणि श्रीमंत, अशा वरपसंतीच्या पायऱ्या त्यांनीं ठरविलेल्या असतात. विलायतेस जाऊन आलेल्या लोकांची कुलंगडीं बाहेर येतांच गोऱ्या सवती घरांत थैमान घालतात. परदेशांत गेलेला विद्यार्थी आचारांनीं बहुतेक स्वैर बनलेला असतो. या सर्व गोष्टी माहीत असून आजच्या शिकलेल्या मुली अशांना माळ घालण्यास उत्सुक असतात. यावरून असेंच म्हणावें लागतें कीं, त्यांना नवऱ्याच्या आचारविचाराची, पूर्वचरित्राची पैशापुढें मुळींच गुमान नसते. सर्वच शिकणाऱ्या मुलींच्या आकांक्षा याच तऱ्हेच्या नसतात असें मानलें तरी

एक गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं आणि ती ही कीं, शाळा-कॉलेजांत असतांना बरोबरच्या मुलांबद्दल असा कांहीं तिटकारा आणि तिरस्कार त्या दाखवितात कीं, तरुणांना त्या नेहमीं अप्राप्यच काय, पण अप्रियहि वाटूं लागतात. मुलांची खोडसाळ वागणूक या प्रकारच्या बुडाशीं थोडीफार असते खरी; पण मुलांतहि सज्जन-दुर्जन असतातच. सर्वांना एकाच तुच्छतेच्या काठीनें दूर लोटूं लागल्यानें त्यांचा पक्ष घेणारा उभ्या कॉलेजांत एकहि विद्यार्थी निघत नाहीं. त्या मुलांशीं बंधुभावानें, जास्त आस्थेनें आणि मनमोकळेपणानें वागतील, तर त्यांच्याबद्दलचा गैरसमज दूर होईल, त्यांच्याबद्दल कंड्या कमी पिकतील, खोड्या करणारांना परस्पर चोप देणारेहि विद्यार्थी त्यांची बाजू घेण्यास पुढें येतील.

मुलगे आणि मुली एकत्र मिसळत नाहींत, म्हणून दोघेंहि लांबून एकमेकांबद्दल आपापली उगीच गैरसमजूत करून घेतात. यामुळें आजच्या कॉलेजांत सहशिक्षण असतांनाहि प्रामाणिक प्रणयविवाह अजून घडून येत नाहींत. शिकलेल्या मुलींचें वय वाढलेलें असतें. कौमार्याची मोहकता जाऊन त्या निस्तेज, रयाहीन आणि राकट दिसूं लागतात. त्या मनांतहि भेरनाशा होतात. त्या स्वतः मात्र आपल्या सौंदर्याबद्दल जितक्या गर्विष्ठ तितक्याच बेफिकीर होत जातात. नियमित व्यायाम, निकोप शरीरप्रकृतीस आणि सौंदर्यवर्धनास जरूर असतो याची जाणीव त्यांना क्वचितच असते. उंची वस्त्रापेक्षां शरिराचा बांधेसूदपणाच जास्त आकर्षक दिसतो. कुबड काढून फेंगडे पाय टाकीत, लुळ्या माणसासारखे हातपाय सावरीत जाणाऱ्या आजकालच्या मुलींकडे पाहून संसारक्षमतेची त्यांची नालायकी कोणाच्याहि मनांत चटकन् येईल.

सौंदर्य हें स्त्रीचें भांडवल आहे; ती लहान असो, तरुण असो, पोक्त असो, अगर म्हातारी असो; तिला आपलें मानाचें स्थान अढळ ठेवावयाचें असेल, तर या भांडवलाचें तिनें सतत संरक्षण केलें पाहिजे. शिकलेल्या मुलींच्या आकांक्षाहि ऐषआरामापलीकडे गेलेल्या नसतात. तेव्हां सहचर निवडतांना त्यांची दृष्टि फारशी उदात्त नसते. कोणतेंहि एक ध्येय नाहीं, अमुक अमुक गुणविशिष्ट नवरा आपणांस पाहिजे अशी निश्चिति मनाशीं नाहीं व ती बोलून दाखविण्याचें धैर्य नाहीं, अनोळखी तरुणांचा स्वभाव आपल्या स्वभावाशीं पटेलच अशी खात्री नाहीं, आणि गृहस्थाश्रमासाठीं आतुर झालेल्यांच्या मनांतहि त्यापायीं कराव्या लागणाऱ्या स्वार्थत्यागाची तयारी नाहीं, या सर्व

गोष्टींमुळें शिकलेल्या मुली लग्नाचें नांव काढतांच भीतीनें गांगरून जातात. अदृष्टांत उडी घेण्याप्रमाणें त्यांना लग्न करणें भीतीचें वाटतें. या भीतीनें त्या मेरेपर्यंत अविवाहित राहण्यासहि कबूल होतात.

कॉलेजांतलीं चार वर्षें केव्हांच निघून जातात. बी. ए. अगर जी. ए. झालेल्या मुलीहि समवयस्क तरुणांच्या संगतीस पारख्या होतात. तरुण व तरुणी निरनिराळीं फुटल्यावर त्या पोक्त बायकांत मोडूं लागतात. तरुण यापूर्वीच त्यांना विसरून जाऊन आपापल्या संसारांत दंग झालेले असतात, आणि असें झालें म्हणजे त्यांचें लग्नाचें कधीं जमेल कीं नाहीं याचीच वानवा वाटूं लागतें. कॉलेजांत शिकत असतांना केलेला अल्लडपणा क्षम्य ठरतो, दाखविलेली धिटाई पोरकटपणा म्हणून समजतात आणि अशा या धीट अल्लडपणांत एखादीचें लग्न सहज जमूनहि जातें. उलट या पोक्त कुमारिकेला संभावितपणाचा आव आणावा लागतो तर खराच; पण ती नाउमेदीनें जास्तच निस्तेज दिसूं लागते. बी. ए. होईपर्यंत नोकरीच्या धुंदीनें उड्या मारणारा तरुण परीक्षा पास होतांच स्वतःची कवडीकिंमत अजमावून, जसा निराश होतो, तशीच शिकणारी मुलगीहि कॉलेजांत असेतोंपर्यंत श्रीमंत, सुस्वरूप नवऱ्याच्या मोटारींत आणि गाद्यागिरद्यांत लोळण्याचीं सुखस्वप्नें मनाशीं जुळवीत असते, तीच बी. ए. होतांच हताश आणि खजील होऊन जाते.

तरुण घेतले काय, तरुणी घेतल्या काय, स्वतःच्या लग्नाबद्दल उच्च महत्त्वाकांक्षा कोणाचीच नसते. आपल्या जोडीदाराबद्दलच्या स्पष्ट आकांक्षा यांपैकीं कोणाच्याच नसतात. या महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल उभयतां वधूवरांच्या आचारविचारांत गंभीरपणा मुळींच नसतो. आणि जबाबदाऱ्यांची तर कोणी पर्वाच करीत नाहीं. वाढत्या तारुण्याच्या ऐहिक गरजा पुऱ्या पाडणें हा लग्नसंस्थेंतील गौण उद्देश असून आज तोच प्रधान हेतु झाला आहे. बौद्धिक सलोख्याचें प्रमाणसूत्र कोणीच घेत नाहीं; मात्र शारीरिक उंचीचीं प्रमाणसूत्रें अजूनहि घेतातच. स्त्रीला ज्या तऱ्हेचें स्थान आपण कुटुंबांत आज दिलें आहे, त्या तऱ्हेचाच आकांक्षांचा पल्ला असावयाचा. घरांत कामधाम करणें, मुलें होणें व त्यांचें संगोपन करणें, यापेक्षां जास्त मातब्बरी त्यांची आहे असें आपण समजतों का ? आणि ह्याच आपल्या संसारचित्राचें प्रतिबिंब आपल्या आकांक्षांत स्पष्ट दिसतें. आपल्या आकांक्षा म्हणजे उत्साहहीन, विकृत आणि हीन

संसारदृश्यांचा चित्रपटच होय; तेव्हां लग्नानंतर मोठमोठ्या निराशा बऱ्याच-जणांना अनुभवाव्या लागल्या तर त्यांत दोष कोणाचा?

आणि अशा निराशांची तीव्रता आणि विपुलता फैलावलेली आज दिसत आहे. लग्नसंस्था ही संस्कृतीची खूण आहे, समाजस्थैर्याची ती जननी आहे. तिचें संवर्धन आणि जतन अवश्य केलें पाहिजे. पण आमच्या ज्या लग्न जमविण्याच्या पद्धति आहेत, त्या योगें लग्नसंस्था आनंदापेक्षां निराशेचा, सुखापेक्षां दुःखाचाच विमा उतरते. आपल्या लग्न जुळविण्याच्या पद्धतींत आमूलाग्र फेरफार झाला पाहिजे. मग तो प्रीतिविवाह असो, लग्नोत्तर प्रीतिविकास असो, सहवासोत्तर विवाह असो, अगर आजचा वडील मंडळींच्या इच्छेवर अवलंबून असलेला अप्रीति उत्पन्न करणारा विवाह असो; आज या लग्नसंस्थेचा डाव कुजलेला आहे। खास! नेमकें गुणांचें हुकमी दान वधूवरांना पडत नाहीं, त्यांच्या सोंगट्या घरांत जात नाहींत. किती तरी गुणांचीं दानें दान न देतां फुकट वायां दवडावीं लागतात! किती तरी सोंगट्या वर्षानुवर्षें नेमकें दान पडेल आणि दुसऱ्याबरोबर घरांत उडी मारून जातां येईल म्हणून तिष्ठत उभ्या राहिलेल्या असतात! दैवाचे फांसे त्या सारख्या खेळत राहतात! डाव कुजला, अशा वेळीं हुकमी दान घेणाऱ्याचीच जरूरी असते, किंवा पडलेलें दान निरनिराळें फोडून सोंगट्यांना घरें मोकळीं करून देणारा कल्पक दान देणारा लागतो. सोंगट्या केव्हां तरी घरांत नेऊन घालावयाच्या असतात. त्याशिवाय चौरंगी खेळ होत नाहीं. तरुणतरुणींना लग्नबोहल्यावर तर आणून उभें करायचेंच; पण तीं एकमेकांवर पूर्वीच अनुरक्त झालेलीं असलीं पाहिजेत असा हट्ट धरला नाहीं तरी स्वभाव, आकांक्षा, शिक्षण या बाबतींत अनुरूप तरी तीं असावींत. तसें साधत नसेल तर बोहलीं पुढेंमागें ओस पडतील. मंगलाष्टकें ऐकत असतां शेंकडा नव्याण्णव वधूवरांचीं काळिजें धडधडत असतात असा अनुभव आहे. भीतीचें कारण हेंच कीं, दरेकाला वाटतें आपण अंधारांत उडी घेतली आहे, जमिनीला पाय लागले तर खरें. ही आमच्या विकृत लग्नपद्धतीची भीति दरोबस्त तरुण मंडळींच्या मनांत वैवाहिक जीवनाचीं भेसूर चित्रें रंगवीत आहे.

---

# प्रीतिविवाह : : ७

सुमारें चारएक वर्षांवरची गोष्ट. माझ्या एका बालमित्राचा पाहुणा म्हणून फर्ग्युसन कॉलेजच्या रेसिडेन्सींत मी दोन दिवस राहण्यास गेलों होतों. मला हें स्थलांतर फारच आल्हादकारक वाटलें. तारुण्याची मजा कांहीं औरच असते! उमलणारीं फुलें स्वतः आनंदानें डोलतातच, पण आपल्या उग्र सुगंधानें तीं पिकल्या पानांनाहि डोलवूं लागतात. शिक्षणसंस्थेंतले लोक जन्मभर आशावादी, उल्हसित कां राहतात आणि तेंहि पण स्वार्थत्यागाची भारी किंमत देऊन, या सर्वांचें कारण मला समजलें. शाळा-कॉलेजांत भरून गेलेलें तारुण्याचें उन्मादक वातावरण हेंच तें कारण होय. माझे ते दिवस अगदीं चुटकीसरसे निघून गेले. केवढें जबरदस्त आशावादाचें वातावरण तेथें असतें! सकाळीं उठल्यापासून तों अपरात्रीं निजेपर्यंत. 'मी असं करीन, मी तसं करीन; माझा हा निश्चय आहे. माझं हें ध्येय आहे.' असे, आवेशाचे उद्गार पदोपदीं काढणाऱ्यांच्या मनांत मानवी कर्तृत्वाचा केवढा बरें बेगुमान अभिमान वसत असेल! मीहि त्यांच्या त्या दंगलीत, वादविवादांत, आणाभाकांत, बेलभंडाऱ्यांत सामील होत असें. मी कोण आहे हें मला लपवून ठेवावयाचें होतें. खरें म्हणाल तर

मला माझें मोठेपण विसरून मनाला चुटपूट लावून निघून गेलेल्या रम्य बाल-पणांत डुंबण्याचा मोह अनावर झाला होता.

कॉलेजमधलीं झालीं तरी मुलेंच तीं! माझ्या हास्यविनोदानें मीं त्यांना तेव्हांच आपलेसें केलें, आणि मग त्यांचीं मनें ते निर्धास्तपणें मजजवळ उघडीं करून बोलूं लागले. स्वतंत्र विचारांच्या थैल्याच्या थैल्या माझ्यापुढें त्या भावनांच्या कुबेरांनीं आणून ओतल्या. त्यांच्या चकचकाटानें मी क्षणैक दिपलें. त्यांतली एखादी थैली भरून बरोबर घेऊन यावी असा मोहहि सुटला. पण लगेच मनांत आलें कीं, या थैलीचें ओझें पेलण्याइतका माझा पाठीचा कणा आतां बळकट कोठें राहिला आहे? नाहीं तर याच ठिकाणीं वीस वर्षांपूर्वीं उधळलेल्या याच द्रव्याच्या व्यापारावर मी धनाढ्य झालें नसतों का? असो. मला तरुणांचीं अंतःकरणें अजमावावयाचीं होतीं; त्यांच्या आकांक्षांच्या भराऱ्या पाहावयाच्या होत्या. चालू सामाजिक प्रश्नांबद्दल त्यांचा कल समजून घ्यावयाचा होता, आणि स्वतःच्या निश्चयाच्या पायीं किती स्वार्थत्याग करावयास ते तयार आहेत हें पाहावयाचें होतें. त्यांची जिव्हाळ्याची, अहोरात्र चर्चेची आणि जीव कीं प्राण अशी गुजगोष्ट जर कोणती असेल, तर बरोबर शिकणाऱ्या मुली हीच होय, हें माझ्या तेव्हांच लक्षांत आलें. वीस वर्षांपूर्वीं अर्धे अधिक विद्यार्थि विवाहित असत, आणि मुलींची संख्या अगदीं बोटांवर मोजण्याएवढी अल्प व तींतहि विवाहितांचें प्रमाण बरेंच! तेव्हां आमच्या काळीं वैषयिक भावनांचा थयथयाट आजच्यासारखा नोडगेपणानें दिसत नसे. मी त्या तरुणांना एकेकास बाजूस नेऊन हळूच विचारी कीं, 'या मुलींपैकीं जिच्यावर तुझें मन बसलें असेल तिनें समज तुझ्याशीं लग्न करण्याचें कबूल केलें तर तसें करण्याची तुझी तयारी आहे काय?' माझ्या प्रश्नानें त्यांतले कित्येक वरमले, कित्येकांनीं अगदीं भांग विस्कटेपर्यंत मानेला नकारार्थी हिसके दिले, तर कित्येक करारी चेहरा करून स्पष्ट 'नाहीं' म्हणून म्हणाले. त्यांनीं जीं कारणें दिलीं तीं विविध होतीं. प्रत्येकाची स्थिति अगतिक व प्रत्येकापुढें दुर्लंघनीय अशा अडचणी होत्या. सर्वांचें म्हणणें एकच कीं, 'आम्ही ह्या मुलींशीं लग्न करणार नाहीं.'

या त्यांच्या उत्तरांनीं माझ्या मनाला धक्का बसला. ही वस्तुस्थिति बऱ्याच तरुणींच्या मनाला धक्का देणारी तर आहेच, पण सडेतोड आणि तेजस्वी

विद्यार्थिनींच्याहि मनांत आजच्या तरुणांबद्दल निखालस तिटकारा उत्पन्न करणारी आहे. मग मुलींच्या पाठीमागें भटकणारे कॉलेजांतील तरुण नुसते बेजबाबदार उल्लू आहेत कीं काय? कीं ज्यांना शिकलेल्या तरुणींचा सहवास लोभनीय वाटत असूनहि लग्नाची जबाबदारी पत्करण्यास ते तयार नसतात? वस्तुस्थिति अशी आहे खरी. आजचा तरुण तरुणीवर प्रेम करील, पण तें केवळ मजेखातर! लग्नाची जबाबदारी हा जाडा शब्द आपण बाजूस ठेवूं; पण त्या तरुणींच्या सहवासांत आजन्म आपण घालवावा, असें या भ्रमरांना मुळींच वाटत नाहीं. प्रेमाच्या माणसाचा अधःपात वेळ पडली तर हे सहज करतील. फार काय, अशा आपण घडवून आणलेल्या अधःपाताकडेहि कानाडोळा ते करतील! हें कशाचें द्योतक आहे? शिक्षणानें आमच्या तरुणांचें स्त्रीदाक्षिण्य उतास चाललें आहे. पण स्त्रियांचें रक्षण करून त्यांना मानाप्रत चढविण्याचे कितीसे प्रयत्न तरुणांच्या वागणुकींत सापडतील? पाश्चात्य देशांत तरुणतरुणी मनमोकळेपणानें प्रेमाची देवाणघेवाण करतात आणि मुग्ध मीलनांतला पहिला आणि शेवटला शब्द लग्न करण्याबद्दलचा असतो. वचनें दिलीं तरी तीं लग्न करण्याचीं, आणि दिलेलीं वचनें पुरीं करावयास तिकडचे तरुण कधींच कचरत नाहींत. पाश्चात्यांच्या चालीरीतीचें अनुकरण करण्यासाठीं झुरणाऱ्या तरुणांनीं त्यांची ही नीतिमत्ता पाहून लाजलें पाहिजे.

आजच्या तरुणांच्यांत भावनेची उत्कटता नाहीं, निश्चयाचा निर्धार नाहीं, ध्येयाची धगधग नाहीं, तेव्हां ते आपल्या व दुसऱ्याच्या आयुष्याचा स्वतःच्या बेताल वागणुकीनें खेळखंडोबा मात्र करतात. स्नेह्यासोबत्यांच्या गोड बोलण्या-वर फसलेल्या मुलींची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. हें दृश्य तरुणांना खास भूषणावह नाहीं. आजच्या तरुणांची वृत्ति न अजमावतां त्यांना सर्वस्व अर्पण करणाऱ्या भोळ्या कुमारिकांची कींव करावी तेवढी थोडी! वडील मंडळी प्रीतिविवाहाच्या तत्त्वतः विरुद्ध नाहींत. हें विधान मी अगदीं पाऊणशें टक्के आईबापांच्या वतीनें जाहीर करतों. एखाद्या तरुणानें मुलीच्या बापाजवळ तिला मागणी घातली तर तिचा अव्हेर झाला तरी तो संभावितपणानेंच होत असतो. वडील मंडळी प्रीतिविवाहाला जो आजकाल कसून विरोध करतात तो त्यांतून उद्‌भवणाऱ्या आपत्तींमुळेंच होय. आपत्ति ओढवली तथापि लग्न झालें तर सर्वच व्यवहार सुरळीत पार पडतात. पण भलताच प्रकार झाला,

तरुण तिच्याशीं लग्न करण्यास नाकबूल असला, म्हणजे तिच्या आयुष्याचें काय होणार या विचारानें मुलींच्या आईबापांना कांपरें सुटतें.

बरें, तरुण तरी प्रीतिविवाहाला कितपत अनुकूल आहेत तें पाहूं. श्रीमंत बापाच्या एकुलत्या एक सुंदर मुलीवर जीव ओवाळून टाकणारे सर्वच तरुण निघतील. पण त्यांत पैशाचें प्रेम अधिक, रूपाचें प्रेम अधिक कीं तिच्या अंगांतील गुणांचें प्रेम अधिक याची फोड होत नाहीं. प्रीतिविवाह हें एक साहस आहे आणि त्यासाठीं तरुणांना मोठा स्वार्थत्याग करावा लागतो. हुंड्याच्या रकमेला अंतरावें लागेल, ही एकच भीति तरुणांचीं तोंडें खरकन् उतरवील. ज्या सुशिक्षित तरुणांना आपला लिलाव करावासा वाटतो, त्यांनीं वधूपसंतीच्या स्वातंत्र्याची वाटेल तर वल्गना करावी. प्रेम, दिव्य प्रेम, बौद्धिक स्नेह, स्त्रीदाक्षिण्य इत्यादि भावना जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं ज्याला दिसतात तो आजचा तरुण, लग्नास उभा राहतो तो प्रेमामुळें, का पैशामुळें, का शरीरधर्माच्या जरूरीमुळें? आजच्या लग्नसंस्थेचें बाजारी स्वरूप पाहिलें म्हणजे तरुणांना प्रीतिविवाह असावा असा हट्ट धरण्याचा हक्क बिलकूल पोंचत नाहीं. कामिनी ही धीरोदात्तालाच मिळत असते. ज्याला द्रव्याचा मोह आवरतां येत नाहीं, त्याच्या त्या भावना काय किमतीच्या असणार? आणि त्यांची छाप ती काय पडणार? आणि प्रीतिविवाहाचा डांगोरा पिटणाऱ्या आजच्या तरुणांच्या मनांत सात्त्विकतेचा तवंग काढून घेतला आहे अशी कामुक भावना थैमान घालीत असलेली सापडेल.

वृद्ध, विपरीत परिणामामुळें विरोधी; तरुण, जबाबदारी टाळणारे कमकुवत वृत्तीचे; तरुणी, अनभ्यस्त, भिडस्त आणि कोंदट वातावरणांत वाढल्यामुळें, अप्रबुद्ध; अशी स्थिति असतां खरें म्हटलें म्हणजे प्रीतिविवाहाचें नांवसुद्धां ऐकूं येऊं नये. वस्तुस्थितीहि तशीच आहे. त्याला इतर आनुषंगिक कारणेंहि येऊन मिळालीं आहेत. आर्थिक दैन्यामुळें आजच्या तरुणांची जी सर्वतोपरी कुचंबणा झालेली आहे, तशी कोणाची कधींच झालेली नव्हती. शक्ति, युक्ति, विद्या, इच्छा, जरूरी, सर्व कांहीं असतांना आजचा तरुण दिवसेंदिवस अन्नालाहि महाग होत आहे. ज्याला स्वतःच्या पोटाकरितां दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहावें लागतें, त्यानें मनांत आकांक्षा तरी कोणत्या ठेवावयाच्या? आणि त्या कशा पार पाडावयाच्या? वडील मंडळींवर अवलंबून राहण्याची स्थिति दिवसेंदिवस

अपरिहार्य होत चाललेली आहे; तेव्हां वडील मंडळींनीं 'अमकीशीं लग्न कर' असा हट्ट धरला, तर कॉलेजांतल्या मैत्रिणीला दिलेलें वचन हवेवर सोडून तरुणांना तिच्याशीं लग्न करावें लागतें. पंचवीस-तीस वर्षांपूर्वीच्या पदवीधरांत 'लाथ मारीन तेथें पाणी काढीन' अशी धमक नसली, तरी साहेबाच्या महिनाभर लाथा खाऊन निदान पन्नास रुपये पहिल्या तारखेस मोजून घेईन अशी हिंमत होती. त्या वेळीं कदाचित् त्याला आपले मनोदय पार पाडतां आले असते. एखाद्या मुलीला आज त्यानें मागणी घातली आणि तिच्या बापानें 'आपण काय मिळवितां' असा सहज प्रश्न केल्याबरोबर त्याचें व्यक्तित्वच जमीनदोस्त होतें. बरें, त्यानें लग्नाचीं वचनें तरी कोणत्या आधारावर द्यावींत? ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं, परकीय सत्तेचें संकट जसें निमूटपणें आपण सवयीनें पत्करतों, तसे प्रणयहीन प्रौढविवाहहि आपण पत्करतों. मुलगी पंचवीस वर्षांची आणि नवरामुलगा पस्तीस वर्षांचा असो, अशांचीं लग्नें जमविण्याची आजची पद्धत अगदीं पाळण्यांतील मुलांचीं लग्नें लावण्याच्या पद्धतीपेक्षां फारशी सुधारलेली नाहीं. कोणी म्हणेल, परस्पर पसंती तीं करतातच ना? पण तेवढ्यावरून त्यांचा प्रीतिविवाह होतो, हें म्हणणें चूक आहे. समजूतदार माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति हीच कीं, एखाद्या जिनसेबद्दल त्याच्या मनांत प्रेम उत्पन्न व्हावें आणि नंतर त्याला वाटावें कीं, ती कायमची आपणापाशीं असावी; मग ती नेकटाय-पिन् असो कीं सहचारिणी असो! तेव्हां असला हा भावनाशून्य प्रौढविवाह प्रणयविवाहाचाच काय पण मानवी प्रवृत्तीचाहि, केवळ उपहास आहे. या सर्व अनार्थाच्या बुडाशीं भावना ठार करून टाकणारी आर्थिक दैना असते.

समाजहि प्रीतिविवाहाकडे तितक्या सहानुभूतीनें अजून पाहूं लागला नाहीं. उभयतां स्त्रीपुरुषांच्या मनांत तसे कांहीं विचार येण्याच्या अगोदरच समाज त्यांचे अनिष्ट संबंध जोडून देऊन कंड्यांची खैरात वाटूं लागतो. ती इतकी कीं, उभयतांना राजरोसपणें एकमेकांचें तोंड पाहणें देखील वर्ज्य करावें लागतें. लग्नांत प्रेम हें काय गौडबंगाल आहे, याची कल्पनाहि नसणारा आमचा अनाडी समाज प्रीतिविवाहावर कुत्सित टीकेची काठी उगारून धावून जातो. कांहीं मनांत नसतांहि जो समाज आपल्यावर आग पाखडतो, तेव्हां आपण खरोखर प्रीतीविवाह केला तर भ्रष्ट झालेल्या कावळ्याच्या पिलाप्रमाणें तो

आपल्याला टोंचून टोंचून ठार करील ही भीति तरुणांना वाटत असते. विशेषतः ह्याचा बागुलबोवा स्त्रियांना जास्त भेवडावतो. पुरुष आपल्या कामांत मग्न असतो. त्याच्या कमाईप्रमाणें आणि कचेरींतील दर्जाप्रमाणें त्याची इभ्रत स्वतंत्र असते व ती लोकनिंदेच्या धुक्यांत गडप होऊं शकत नाहीं. त्याच्या उलट स्त्रियांना स्वतंत्र महत्त्व नाहीं, प्रतिष्ठा नाहीं आणि त्यांची गाठ पडावयाची ती, टवाळीशिवाय दुसरा उद्योग नाहीं अशा स्त्रीवर्गाशीं. रूढीविरुद्ध लग्न करण्यास स्त्रिया तयार होत नाहींत; कारण त्यांना ह्या सामाजिक बहिष्काराची भयंकर भीति वाटते. प्रतिष्ठेकरितां हपापलेल्या स्त्री-स्वभावास सामाजिक अवहेलना म्हणजे विजेचा धक्काच वाटतो. प्रणयविवाह मिश्रविवाहच काय पण अत्यंत जरूरीचा पुनर्विवाहहि घडून येत नाहीं, याचें कारण पुरुषांपेक्षां स्त्रिया रूढीविरुद्ध लग्न करण्यास तयार होत नाहींत हेंच.

मुलींच्या ठिकाणीं फाजील लाजाळूपणा, नव्हे भिडस्तपणा असतो. तिच्या-च्यानें आपलें मन तरुणाजवळ बोलून दाखविण्याचें धाडस होत नाहीं. तेव्हां तरुण निराश होऊन तिचा नाद सोडून देतो, म्हणजे वडिलांनीं जमवीत आणलेल्या लग्नास उभा राहतो. त्याचें लग्न होऊन जातें. नंतर कांहीं दिवसांनीं तिच्या तोंडून क्वचित् तिचे विचार बाहेर पडले तर पडतात, पण मग त्याचा काय उपयोग? स्त्री-स्वभाव भ्रमरवृत्ति नसतो. बरेंवाईट जें त्या एकदां मनानें वरतात त्याला त्या अखेरपर्यंत बिलगून राहतात. अढळ निष्ठा हा त्यांच्या स्वभावाचा विशेष दुबळेपणा आहे आणि व्यसनी, दुष्ट, कुरूप, व्याधिष्ट, पशुवृत्ति पुरुषांस त्या आपत्तींतहि सोडीत नाहींत ही नैसर्गिक अढळ निष्ठा—याचेंच नांव पतिव्रताधर्म. परिणाम असा होतो कीं, त्यांच्या या भिडस्तपणामुळें त्यांना कायमच्या सुखास अंतरावें लागतें. दुसऱ्या पुरुषाशीं तिनें लग्न केलें, चार-दोन मुलेंबाळें होऊन त्यांच्याबरोबर लौकिकदृष्ट्या तिचा संसार यशस्वी झाला, असें असूनहि तिला अनन्यनिष्ठ निर्भेळ आनंदास पारखेंच व्हावें लागतें. त्यांच्या भिडस्तपणामुळें त्या आपली कष्टी मनःस्थिति कोणाजवळ बोलून दाखवीत नसल्या तरी, तरुणपणीं प्रेमाच्या बाबतींत झालेली निराशा, त्यांच्या सर्व आनंदावर, उल्हासावर, एकसारखें विरजण घालीत असते. अलीकडे मुलींचीं वयें वाढलेलीं असतात. त्यांच्या आवडी-निवडी स्थिर झालेल्या असतात. फार काय, पण त्यांचें मन कोणा ना कोणा तरुणावर गेलेलें असतें. अशा

स्थितींत केवळ त्यांच्या भिडस्तपणाचा, शालीनतेचा आणि वडीलकीच्या अधिकारांचा फायदा घेऊन त्यांच्या इच्छेविरुद्ध आईबापांनीं घडवून आणलेलीं त्यांचीं लग्नें सुखाचें वाण त्यांच्या पदरीं पडूं देत नाहींत, ही एक महत्त्वाची बाब असूनहि पालकांचें तिकडे जरूर तेवढें लक्ष जात नाहीं. भिडस्तपणामुळें आपण स्वतःवर केवढा अनर्थ ओढवून घेत आहोंत, याची कल्पना तरुण मुलींना होत नाहीं व त्यांना आपलें मन बोलून दाखविण्याचें निकराचें धारिष्ट्य होत नाहीं.

आणि एखाद्या कुमारिकेनें तसें आपलें मन तरुणाला कळविलें, तर तरुणाची तरी प्रीतिविवाह करण्याची तयारी कुठें असते? एक घडलेली गोष्टच सांगतों. माझ्या एका मित्राची मुलगी रोज नारायण पेठेच्या रस्त्यानें फर्ग्युसन कॉलेजांत जात असे. रस्त्यावर राहणाऱ्या तिच्याच वर्गांतील एका तरुणावर तिचें मन गेलें. तोहि तिची पाळत ठेवून नेहमीं दारांत उभा राहत असे. कॉलेजांत तिच्याबरोबर जात येत असे. मुलगी स्वतः स्वरूपानें सुंदर, अगदीं हजारांत उठून दिसावी, निरोगी आणि खेळकर वृत्तीची. तिला असें वाटलें कीं, तो तरुण तिच्यावर आसक्त झालेला आहे. तिला तिचे वडील पूर्ण स्वातंत्र्य देणारे होते, तेव्हां तिनें धीटपणा दाखवून त्या तरुणाचें नांवगांव मिळवून एक अगदीं मामुली पण स्वतःचें मन प्रगट करणारें पत्र त्यास पाठविलें. त्या पत्राचें हो-नाहीं उत्तर देण्याऐवजीं, अगर पत्र फाडून टाकण्याऐवजीं, त्या तरुणानें पितृभक्तीस जागून तें पत्र आपल्या वडिलांना नेऊन दिलें. त्याला आपल्या संयमाची, नीतीची प्रौढी मारावयाची होती, का अनायासें हातांत कुचेष्टा करण्याचें साधन आलें असतां मुलीची टिंगल करण्याच्या मनोवृत्तीस तृप्त करावयाचें होतें, तें सांगणें कठीण आहे; पण त्या पत्रानें अनर्थ ओढवला खरा. मुलाचा बाप माझ्या स्नेह्याकडे आला. 'तुमच्या मुलीनें माझ्या सोन्याबाळाला बिघडवून टाकण्याचा घाट घातला होता, पण माझाच मुलगा म्हणून तो निःस्पृह राहिला. तुम्ही मुलींना वाढवितां तर खुशाल वाढवा, पण त्यांनीं तरुणांना वाईट मार्गाला तरी लावूं नये, अशी खबरदारी घेणें तुमचें कर्तव्य आहे!' वगैरे वगैरे शेलक्या शब्दांनीं, जमदग्नीच्या रागानें, रामशास्त्र्याच्या निःस्पृहतेनें, त्यांनीं मुलीच्या बापाची यथेच्छ हजेरी घेतली. आतां त्या मुलीच्या पत्रांत फक्त 'तुमचा लग्नाचा विचार असेल तर

मी वडिलांना सांगेन ' येवढेंच लिहिलें होतें. पण केवढाले मोठमोठे आणि काय भलभलते आरोप तिच्यावर लादण्यांत आले? स्त्रीदाक्षिण्याची, स्त्रीस्वातंत्र्याची तरफदारी करणारी तरुण मंडळी, त्यांतलाच हा अट्टल तरुण. तेव्हां तो फक्त बापाबापांची जोडाजोडी जुंपवून स्वस्थ बसला नाहीं. कॉलेजांत ज्याच्या त्याच्या तोंडीं ही हकीगत झाली. तिला येतांजातांना, वर्ग सुटल्यानंतर, अगदीं बीभत्स टीका निमूटपणें सहन करावी लागली. 'अज्ञात कुलशीलेषु वैरी भवति सौहृदम्'! कुलशीलाची माहिती नाहीं अशा अनोळखी ठिकाणीं जडलेलें प्रेम शेवटीं शत्रुत्व संपादन करतें, ही कालिदासाची उक्ति खरी झालेली तिनें पाहिली. राहिलेलीं कॉलेजांतील वर्षें तिनें खजील होऊन काढलीं. आज ती अनुरूप सुशिक्षित नवऱ्याबरोबर आनंदानें संसार करीत आहे, हें तरी तिचें नशीब. नाहीं तर मुलींची झालेली बेअब्रू सहसा धुऊन निघत नाहीं. मुलींच्या बेअब्रूची गाठोडीं बरोबर घेऊन परत आलेले विद्यार्थी कंड्यांचीं तुणतुणीं खेडेगांवच्या कानाकोपऱ्यांत वाजवीत सुटतात. या उदाहरणावरून आजचा तरुण किती सहानुभूतिशून्य, टिंगलप्रिय, स्त्री-शत्रु आहे हें सिद्ध होईल. मुलींना नांवानें लिहिलेलीं पत्रेंसुद्धां शेंकड्यावारी येतात, तर निनांवी पत्रांची खिजगणतीच नको. पण हा तोंड दाबून कुचेष्टेच्या बुक्क्यांचा पोस्टपत्रांचा पोलिशी गुपित मार, कुमारिका किती सहनशीलतेनें सोशीत असतात याचा कोणी विचार केला आहे का?

एवंच, आजचा काल सर्वथैव प्रीतिविवाहाला प्रतिकूल आहे. पण प्रीतिविवाह हाच खरा श्रेष्ठ प्रकारचा विवाह होय. तेव्हां हा अमलांत कसा आणावा हा प्रश्न दरेकजणापुढें उभा राहतो. तरुण अधिक उदार, जास्त भावनानिष्ठ, बरेचसे निश्चयी, पुरेसे धीट आणि करारी झाले, तर हा प्रश्न जवळ जवळ सहज सुटणार आहे. पुरुषजातीला प्राप्त झालेल्या सामाजिक आणि कौटुंबिक प्रतिष्ठेची पुण्याई इतकी मोठी आहे कीं, तरुण पिढीनें मनांत आणलें तर विरोधी रूढीची व परिस्थितीची मुंडी मुरगाळून त्यांना फेकून देऊं शकतील. अनिष्ट परिणामांच्या भीतीनें गांगरलेल्या विरोधी वृद्धांनींहि प्रीतिविवाह आपल्या देखरेखीखालीं, डोळ्यांदेखत घडवून आणण्याचा पायंडा घालून दिला पाहिजे. मुलींच्या हातून चोरून गोष्टी व्हाव्यात, अनिष्ट माणसाशीं तिच्या आणाशपथा व्हाव्यात आणि नंतर चिडून जाऊन बलिरामशाही धडपडाट करण्याची

वेळ यावी, यापेक्षां जें नैसर्गिक आहे तें आपल्या देखरेखीखालीं मर्यादशील मार्गानें होऊं दिलें, तर पश्चात्ताप करण्याचा प्रसंग तरी येणार नाहीं. आज अनोळखी दूरगांवच्या मुलाला मुलगी देऊन टाकणारा बाप, तिच्या वैवाहिक सौख्याची योग्य काळजी घेतो, असें कितपत म्हणतां येईल? आणि बेबनावाचे, फसवेगिरीचे, क्रूरतेचे, दुष्ट व्यसनांचे प्रकार उघडकीस येऊन हायहाय करीत बसण्याचे प्रसंग कित्येक मुली व त्यांचे आईबाप ह्यांच्यावर येतातच ना? स्थळें हुडकणें, टिपणें जमविणें, हुंडे पटविणें, हे एकापेक्षां एक अवघड घाट चढण्यास मुलींच्या बापांस कांहीं कमी श्रम पडत नाहींत, त्यांच्या मानानें योग्य तरुण निवडून त्यांची व मुलींची ओळख करून द्यावयाची, त्यांतून अनुरूप तरुणांची निवड करण्यांत आपण त्यांना मदत करावयाची, हें अगदीं जोखमीचें काम किती तरी सोपें! तरुणींनींहि आतां आपलें मन पालकांजवळ स्पष्टपणें बोलून दाखविलें पाहिजे, सामाजिक विरोधाची भीति बाजूस सारली पाहिजे, म्हणजे त्यांना आपलें ध्येय सहज गाठतां येईल. शेवटीं समाजानेंहि बदलती परिस्थिति लक्षांत घेऊन अशा प्रकाराबद्दल सहानुभूति दाखविली पाहिजे. निदान त्याकडे दुर्लक्ष जरी त्याला करतां आलें तरी पुष्कळ काम होईल.

प्रीतिविवाहाच्या पायावर उभारलेली लग्नसंस्था, जोडप्यांच्या वैवाहिक सुखसंसारांनीं गजबजलेली व ऐहिक आनंदाच्या फवाऱ्यांनीं न्हाऊन गेलेली दिसेल. आजचे तरुण, मध्यम वयाचे, म्हातारे स्त्री-पुरुष वैवाहिक जीवनाबद्दल मनांतून असंतुष्ट असतात; त्याचें कारण म्हणजे त्यांच्या भुकांची झालेली उपासमार होय. ही भूक तारुण्यांत प्रखर असते. याच वेळीं ज्यानें त्यानें आपल्या आवडीनिवडीप्रमाणें मित्र शोधून काढला तर लोभनीय वस्तुप्राप्तीचा आनंद त्याला जन्मभर समाधानाचा झरा पुरवीत राहील.

## नंदनवनांतील खांचखळगे : : ८

निरनिराळ्या विवाहप्रकारांपैकीं प्रीतिविवाह हाच शेवटीं विजय पावेल असें बिनचूक भाकित सहज करतां येईल. विवाह उरकून घेण्याची पद्धत ही जुन्या तऱ्हेची, म्हणजे सध्यांची ब्राह्मी पद्धत, अजूनहि पुष्कळ दिवस टिकेल; पण पालकांनीं लग्नें जुळवून आणण्याची आजची रीत मात्र फार दिवस टिकूं शकणार नाहीं. वडील मंडळींनीं जमवून आणलेले विवाह बरेचसे अपयशी ठरले. निदानपक्षीं बहुतेक अपयशी विवाहांचें खापर सकारण वा अकारण पालकांच्या कपाळावर फोडण्यांत येतें. पालकहि अशा तटस्थपणानें आतांशा वागूं लागले आहेत कीं, मुलांमुलींना लग्नाच्या बाबतींत त्यांनीं पूर्ण मोकळीक दिलेली आहे असें वाटावें. आणि तसेंच पाहिलें तर लग्नसंस्थेचा परमोत्कर्षाचा बिंदु म्हणजे प्रीतिविवाह होय. समाजाची उत्क्रांति तो बिंदु गाठण्याकडे होत असते, आणि त्या बिंदूला ओलांडून खालीं उतरूं लागणारा समाज संसारसुखाच्या अपकर्षाच्या उतारावरून झपाट्यानें घसरतांना दिसेल. या अत्यंत श्रेष्ठ अशा प्रणयविवाहाचा मार्ग, हा मात्र असावा तितका सरळ आणि सुरक्षित नसतो.

त्याच्यावरील धोक्याचीं ठिकाणें माहीत असलीं तर बरेचसे अपघात टाळतां येतील.

तरुण स्त्री-पुरुष अगोदरच अविचारी असतात आणि ते एकत्र येतांच त्यांचा उल्लूपणा मर्यादेंत राहीलच असा नेम नसतो. न अनुभवलेल्या अनुभवांची धुंदी, मनुष्याची विचारशक्ति आणि शरीरावरचा ताबा यांना केव्हांच खिळखिळी करीत असते. तेव्हां अशीं हीं स्फोटक द्रव्यें एकटींच्या एकटीं एकमेकांच्या सहवासांत आलीं, तर सर्वच वेळीं तीं सहीसलामत निभावून निघतील असा नियम नसतो. वडील मंडळींच्या नजरेखालीं आणि धाकांत अगर लहान भावंडांच्या घोळक्यांत असतांना चाललेली प्रणयचेष्टांची देवघेव ही तितकीशी एकदम पेट घेत नाहीं, म्हणून घातुकहि नसते आणि एवढ्यासाठीं प्रणयविवाहास चालना आणि प्रोत्साहन देणाऱ्या वडील मंडळींनीं योग्य बंदोबस्तांतच विवाहेच्छु स्त्रीपुरुषांना एकत्रांत वागूं द्यावें. युरोपियन शिष्ट समाजांत वडील मंडळींच्या देखरेखीखालीं प्रीतिविवाह जमून येत असतात. विशेषतः मुलीची आई ही मांजरीच्या दक्षतेनें आपल्या मुलीची एकसारखी पाठराखण करीत असते. उभयतां सिनेमा-नाटकाला गेलीं, तरी त्यांच्याबरोबर आपलें एखादें जाणतें मूल धाडून द्यायला ती चुकत नाहीं.

खुद्द तरुण मंडळींनींहि दक्षता बाळगणें जरूर असतें. प्रियाराधनाचा जादुगिरीचा काळ हा विलक्षण भुलभुलावणी दाखविणारा असतो. एकमेकांचा स्वभाव आणि शरीरें हीं वरवरच्या ओझरत्या ओळखीमुळें भलतींच मोहक वाटूं लागतात. तीं इतकीं कीं, त्यांतील वैगुण्याकडे कोणाचें लक्षहि जात नाहीं. 'दुरून डोंगर साजरे' ह्या म्हणींतील सत्यता, दुरूनदुरून एकमेकांची आराधना करणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या बाबतींत अनुभवास जितकी येते, तितकी ती दुसरीकडे कोठेंच पटत नाहीं. एक दुसऱ्याला जेवढें चांगलें समजतो, तेवढेंच तो स्वतःला दुसऱ्यापुढें शरणागतहि मानूं लागतो. वैषयिक उन्मादानें अगर ध्येयाच्या कैफानें व्यक्तित्व विसरून गेलेल्यांच्या मनांत गुणावगुणांची विचक्षणा थोडीच असणार? आणि मनाला व शरीराला ताब्यांत ठेवण्याची तारतम्यबुद्धि कोठून शिल्लक राहणार! हें जरी खरें आणि अनिवार्य आहे, तथापि ह्या अविचाराच्याच मामल्यांतून उत्पन्न होणारीं दुःखें डोळ्यांससोर जर आणलीं नाहींत, तर न जाणो, गवताखालीं लपलेल्या पडीक विहिरींतच ती तरुणमंडळी

जाऊन पडावयाचीं आणि जन्मभर गटांगळ्या खात रहावयाचीं! विशेषतः याचे भयंकर परिणाम सोसण्याची पाळी स्त्रियांवरच येते. पुरुष हा प्रणयव्यापारांत धिटाईनें नेहमींच चढाई करीत असतो; उघडउघड खोटीं आश्वासनें देत असतो; आणि त्या आश्वासनांवर विश्वास ठेवून जी भोळी तरुणी त्याच्या धिटाईच्या सलगीचा जरूर तितक्या जोरानें प्रतिकार करीत नाहीं, ती हकनाक फसते. साधारणतः अब्रूरक्षणाची दरेक स्त्रीस उपजत बुद्धि असते. निसर्गाच्या विशिष्ट घटनेमुळें बारीकसारीक चुकीचे भयंकर परिणाम तिलाच भोगावे लागतात. अब्रूरक्षण हें तिला जिवापेक्षांहि जास्त मूल्यवान् वाटत असतें; आणि वैषयिक बाबतींत ती स्वभावतःच सुरुवातीस उदासीन असते. म्हणून तिचें रक्षण बऱ्याच वेळीं आपोआप होतें हें खरें. पण केवळ मन दुखवूं नये म्हणूनच ती पुष्कळ वेळां पुरुषाच्या वैषयिक काकुळतीस बळी पडते. तिचा प्रियकर सत्यनिष्ठ असेल, उभायतांकडील वडील मंडळींची त्यांच्या लग्नास कोणत्याहि तऱ्हेची हरकत नसेल, तर अशा स्थितींत झालेलें मर्यादेचें अतिक्रमण लग्नविधीच्या शिक्कामोर्तबाबरोबर क्षम्य ठरतें. खुद्द त्यांनाहि तें कौतुकास्पद वाटतें. पण जर का तो निखालस फसव्या असेल, अगर वडील मंडळींचा त्या लग्नास असलेला विरोध त्यांना मोडतां येत नसेल, तर या फसवणुकीचे सर्व दुष्ट परिणाम स्त्रीलाच भोगावे लागतात. मातृपद ही स्त्री-पुरुषांच्या एकत्र येण्यांतून उत्पन्न होणारी अनिवार्य घटना होय. विवाहित अगर अविवाहित स्त्री असा भेद निसर्गाच्या नियमांत नाहीं. अविवाहित मातृपद त्या स्त्रीला समाजांतून कायमचें उठवितें. हा एक मोठा अन्याय आहे खरा! पोरवयांतील म्हणून क्षम्य व क्वचित् होणाऱ्या त्या चुकीबद्दल भोगावी लागणारी शिक्षा फार भयंकर असते कीं, जिच्यापुढें फांशीची शिक्षाहि हलकी ठरेल. हा भयंकर परिणाम डोळ्यांपुढें ठेवून स्त्रीनें वागलें पाहिजे. अशा तरुणीचें पुन्हा लग्न होण्याची तर आशाच नसते. पण कुमारी विधवेचें आयुष्य तिनें कंठावयाचें म्हटलें तरी भोंवतालचा समाज तिच्या त्या व्रणावर प्राणघातक चोंचींनीं सारखे प्रहार करीत राहतो; आणि त्या जखमेंतून जन्मभर प्राणांतिक वेदनांचें रक्त निथळत राहतें.

लग्न झालें, सर्व सुरळीत चाललें, तरी लवकर वश होणाऱ्या स्त्रीबद्दल तिच्या नवऱ्याच्या मनांत एक भलतीच काळजी वाटूं लागते. जिनसेची किंमत ही

ती मिळविण्यास पडणाऱ्या कष्टावर अवलंबून असते. कष्ट कमी तर जिनसेची किंमत कमी हें त्रैराशिक, कोणी म्हणेल पतिपत्नींत कसें लागू पडेल? व तें लागू पडणार नाहीं असें आपण पाहिजे तर मानून चालूं. पण लग्नापूर्वी तिऱ्हाईत म्हणून जे आपल्याला स्वपत्नीबद्दल बरेवाईट अनुभव आलेले असतात त्यावरूनच लग्नानंतरच्याहि तिच्या तिऱ्हाइतांबद्दलच्या मनाच्या ठेवणीचा कयास नवरा बांधणार. ती भुलथापांनीं किती लवकर आणि कोणत्या मर्यादेपर्यंत वश झाली ह्याचा चित्रपट त्याच्या डोळ्यांपुढें सारखा असतो. आणि असाच प्रसंग पुन्हा उत्पन्न झाला तर न जाणो ती भाबडेपणानें सहज फसण्याचा संभव होय, हीच त्याची भीति आणि हीच धास्ती त्याला अहोरात्र बेचैन करीत राहते. पुरुषाचा उल्लूपणा हाहि तितकाच त्याच्या पत्नीला अस्वस्थ करीत असतो. पतीकडे त्या नेहमीं मत्सरी दृष्टीनें पाहत असतात. दुसऱ्या बाईची पडछायासुद्धां तिला आपल्या नवऱ्याभोंवतीं वावरलेली सहन होत नाहीं. आणि तशांत जर का तिच्या नवऱ्याच्या उल्लूपणाबद्दल अनुनयकालांतील अनुभवांवरून तिची खात्री पटलेली असेल तर मग तिच्या संशयाला पारावरच राहत नाहीं! उभयतां स्त्री-पुरुष सुलभप्राप्य अगर उल्लू वृत्तीचे असतील तर चुटकीसरसें लग्न जमून येईल खरें, पण तितकेंच तें ठिसूळहि ठरेल.

चंचल प्रवृत्ति ही माणसाला प्राप्तस्थितींत तेव्हांच असंतोष वाटावयास लावते. भोंवतालीं दिसणाऱ्या जिनसांवर तो मोहित होतो आणि बेभान होऊन तिकडे धावत जातांना पहिल्यानें तो आपल्या घरकुलालाच लाथाडीत असतो. हा उल्लूपणा वैवाहिक सुखाच्या दृष्टीनें अत्यंत हानिकारक आहे. विचारस्वातंत्र्याची अमर्याद महती गाणारे तरुण दरेक बाबतींत उल्लूपणा अवश्यमेव गुण म्हणून भले समजोत! केवळ खिलाडुवृत्तिद्योतक म्हणून जोंपर्यंत त्यांनीं अल्पस्वल्प उल्लूपणाला जवळ केलेलें असेल तोंवर ठीक असतें; पण बेफाम उल्लूपणाच्या मंडपीवर त्यांनीं आपल्या संसाराची कायमची मांडामांड करूं म्हटलें, तर तो संसार तेथेंच टाकून त्यांना निरनिराळे फोडून देशोधडीं तो भटकवीत ठेवील, म्हणून ह्या उल्लूपणापासून उभयतांनीं आपलें रक्षण करावें.

ह्याचा अर्थ असा मात्र करावयाचा नाहीं, कीं तरुणांनीं फाजील लाजाळूपणा ठेवावा. लाजाळूपणा हा स्त्रियांच्या ठिकाणीं नैसर्गिक असतो आणि

कांहीं एका मर्यादेपर्यंत तो शोभून दिसतोहि. सौंदर्याला आविर्भावांतील मार्दव जसें मोहक बनवितें, तसा हा लाजाळूपणा त्यांच्या स्वभावास आकर्षकपणाचे पैलूच पाडीत असतो. जात्याच स्त्रियांना आपले विकार बोलून दाखविण्याचें धैर्य होत नाहीं, स्वतःच्या भावना स्पष्ट समजत नाहींत, आणि नेमक्या शब्दांत त्या व्यक्त करतां येत नाहींत. त्यांच्या मनांत चाललेली कालवाकालव चेहऱ्यावर झरझर येऊन जाणाऱ्या विचारमेघांच्या पडछायांवरून ताडावयाची असते. त्यांची अनुमति उत्तर न देण्यावरूनच नक्की करावयाची असते; आणि त्यांचें प्रेमहि अवांतर गोष्टींत दिसून येणाऱ्या आपुलकीच्या आस्थेवाईक वागणुकीवरून ताडावयाचें असतें. तेव्हां थोडाफार लाजाळूपणा तरुणींच्या अंगांत असणें इष्टच होय. पण तरुणांच्या दृष्टीला कडक उन्हाप्रमाणें मानून कुमारिकांना अगदीं अंधऱ्या खोलींत दडून बसण्यास सांगणारा लाजाळूपणा हा विनयाचा घातुक अतिरेक होय. अशा प्रकारचा लाजाळूपणा तिच्या ठिकाणीं असेल तर ती इतरांचीं मनें आपणांकडे क्वचित-च वेधूं शकेल. आणि क्वचित् एखाद्याचें वेधून घेतलेलें मन पुरें ताब्यांत घेण्यास जरूर ती प्रणयचेष्टांची देवघेव करण्याचें धैर्य तिच्या अंगीं नसल्यानें ती प्रीतिविवाहाच्या मामल्यांत अपयशीच ठरेल. अनेक व्यक्तींपैकीं एखाद्या व्यक्तीची मनानें निवड केली तरी ती निवड ती बाहेर दाखविणार तरी कशी ? ती खुद्द त्या व्यक्तीच्या नजरेस आणणार तरी कशी ? एवंच, लाजाळू-पणाचा अतिरेक हा तरुणीला त्याज्यच होय. पण त्याचबरोबर धीटपणाचा अतिरेक हाहि एक तर तरुणाच्या मनांत तिच्याबद्दल अविश्वासाचा तिटकारा उत्पन्न करील, नाहीं तर अशा अडचणीच्या ठिकाणीं तिला आणून सोडील, कीं जिथून अब्रूनिशीं सहीसलामत परत फिरणें तिला दुरापास्त होईल. पुरुष हा जात्याच धीट आणि प्रेरक असतो; व तरुणीहि धीट असेल तर तो तिचा गैरफायदा घेतल्याखेरीज कधींच राहणार नाहीं. पुरुषाच्या ठिकाणीं लाजाळू-पणा कितीहि अल्प प्रमाणांत असेना, तो महान् दुर्गुणच ठरेल. आणि प्रीति-विवाहांत कुलशीलवान संभावित तरुण, जे नेहमींच नामोहरम झालेले दिस-तात, तेहि ह्या लाजाळूपणामुळेंच होत. 'स्त्री ही धिटाईच्या गैरवाजवी सलगीनें-च वश होणारी वस्तु आहे.' आणि विस्मय उत्पन्न करणारे विधर्मीय अगर विजातीय विवाह ज्या ज्या ठिकाणीं घडून आले, त्या त्या ठिकाणीं-

पुरुषांची ही चढाईची सलगी हेंच एकच्या एक कारण आढळून येईल. प्रीतिविवाह करण्याची जर पुरुषाची महत्त्वाकांक्षा असेल तर त्याच्या ठिकाणीं थोडेंसें साहस आणि थोडासा धीटपणा, जो उल्लूपणाच्या सदराखालीं येणार नाहीं असा, पाहिजेहि. विनयशील वागणुकींत विकारांवर मिळविलेल्या विजयाची प्रतीति होत असते. आणि जो स्वतःच्या विकारांवर काबू राखील अशाच पराक्रमी, संयमी आणि धीरोदात्त पुरुषाच्या हवालीं स्त्री आपलें जीवनसर्वस्व करण्यास तयार होते.

पुरुषाला पत्नीच्या ठिकाणीं, काळजी आणि क्रीडा या दोन्ही द्वंद्वांत बरोबरीनें चालणारी आणि उत्तेजन देणारी, जिवलग सखी पाहिजे असते. तिच्या मनाचा प्रेमळपणा आणि शरीराचा मोहकपणा, यांचीच त्याला विशेष किंमत असते. पुरुष हा एक आधार म्हणूनच स्त्री त्याला पत्करीत असते. तेव्हां तो जेवढा संयमी, जेवढा धीरोदात्त, जेवढा तिची काळजी घेणारा, तेवढा तिला तो हवाहवासा वाटतो. ही परस्परविरुद्ध मनोरचना लक्षांत घेऊन तरुणतरुणींनीं प्रीतिविवाहाच्या प्राथमिक उपायांची मांडामांड करावी म्हणजे अचूक दान पडून त्यांचा डाव लवकर यशस्वी होईल.

अनुनयनाचा काल उभयतांची निरनिराळ्या तऱ्हांनीं परीक्षाच करीत असतो. 'नाहीं, होय' दीर्घकालपर्यंत म्हणण्यानें सत्यनिष्ठेची दोरी ओढून-ताणून बळकट आहे कीं नाहीं, हें आपोआप दिसून येत असतें. एकच्या एक दृष्टांतून प्रेमाची उत्कटता व अगतिकता हीं स्पष्ट होत असतात.

वडील मंडळींना नापसंत म्हणून दीर्घकालपर्यंत लग्न लांबणीवर टाकण्यांत वासनांची जी उपासमार सहन करावी लागते, ती तरी स्वार्थत्यागवृत्तीची कसोटीच म्हणावयाची नाहीं तर काय! दुसऱ्यांतील बारीकसारीक दोष आणि खोड्या ह्या आंधळ्या प्रेमानें दिसेनाशा होतात असें कोणी म्हणेल; पण त्या आसक्त मनाचें पृथक्करण केलें तर त्यांत सहानुभूतीच्या पंखाखालीं ते सर्व दुर्गुण मुद्दाम झाकून ठेवलेले दिसतील. गाण्यांपूर्वी तंबोऱ्याच्या तारा मिळवितात, त्यांच्यांत संवेदना उत्पन्न झाली तरच सर्वांचा मिळून एकसारखा भरघोस निनाद त्या बाहेर टाकूं शकतात. एकमेकांचे स्वभाव, स्वभावांतून निघणाऱ्या भावना आणि भावनांच्या पोटीं राहणाऱ्या विचारांचीं सुतें, हीं

निरानिराळीं सोडवून त्यांतलीं जास्तींत जास्त जितकीं एकजीव होतील, तितक्या मानानें वैवाहिक जीवनाची गुंफण घट्ट, आकर्षक आणि बळकट! भावनांचा एक सूर सहसंवेदना उमटवीत असेल तर त्या दोन व्यक्तींच्या वैवाहिक जीवनांत अखंड आल्हाददायक ऐक्याचे भरघोस आनंदसूर निघत राहतील. शारीरिक सौंदर्यहि पुनःपुन्हा पाहण्यानें मनांत अधिकाधिक ठसतें. पहिल्या नजरेलाच प्रेम जडणें हें निखालस घातुकच. त्यांत ऐनजिनसी विषयासक्तीच सापडेल. शारीरिक सौंदर्याचे गुणावगुण जाणून दुसऱ्याबद्दल उत्पन्न झालेलें आकर्षण हें चिरस्थायी स्वरूपाचें असतें आणि ह्या सर्व गुणांची नुसती वरवर चांचणी, नव्हे कसून परीक्षा होत असेल, तर ती या अनुनयकालांतच. मनहि परीक्षक आणि परीक्ष्य यांच्या एकतानतेनें मोहजालाचे धागे एकमेकांभोंवतीं भराभर टाकण्यांत, ते खेचून पाहण्यांत, आणि त्यांत स्वतःसुद्धां गुरफटून घेण्यांत गर्क असतें. आणि म्हणूनच तो काल खुद्द विवाहोत्तर कालापेक्षांहि अत्यंत रमणीय भासत असतो.

ह्या रमणीय प्रांतांतून सहल करतांना त्यांतील अननुभूत सौंदर्यानें, अनुभवानें व अपेक्षित आकांक्षेच्या सुखस्वप्नांनीं कोणीहि देहभान विसरून जाईलच; पण त्या नंदनवनांतहि जीं कांहीं धोक्याचीं, दलदलीचीं ठिकाणें आहेत, तीं जर चुकवितां आलीं नाहींत तर त्यांचा नाश होईल हेंहि तितकेंच खरें. म्हणून डोळ्यांवर चढलेला कैफ थोडा उतरवून पायाखालची वाट न्याहळीत चालणें हेंच शहाणपणाचें व हिताचें ठरेल.

# कोणता वर पसंत करावा ? : : ९

स्त्रियांच्या दृष्टीनें लग्नाचें महत्त्व फार आहे. सध्यांची त्यांची आर्थिक पराधीनता त्यांना परावलंबी करते, तर लग्नसंस्काराची अभेद्य बेडी त्यांना संसारनरकांत कायमचें पिचत ठेवते. सुखाचें कारक व मारक आणि दुर्दैवाचें कारण व परिणाम, ह्या कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी स्त्रियांच्या दृष्टीनें लग्नाचें महत्त्व आणि उग्र स्वरूप यांचें जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच. अनुकूल परिस्थिति आणि अनुरूप पतिराज, ज्या स्त्रीला लाभले तिचा जन्मजात आपत्तीच्या शिलेपासून उद्धारच झाला म्हणून समजावें. पण गुणी स्त्रीला ह्या दोन्ही बाबतींत निराशा सोसावी लागली, तर तिचें आयुष्य म्हणजे मर्त्यलोकांत जिवंत असतांहि यमलोकांत झालेला तिचा कडेलोट होय. एक वेळ परिस्थितीचा जाच मनुष्य सहन करूं शकतो, आपल्या चातुर्यानें परिस्थितीलाहि तो वांकवितो; पण विपरीत माणसाशीं जन्माची गाठ पडली म्हणजे स्त्रीला सोसावा लागणारा नरकवास कायमचाच होय. ह्या दृष्टीनें अनुरूप पति मिळणें ही त्यांच्या सर्व जीविताच्या यशाची गुरुकिल्ली होय.

पतीची निवड पूर्वी सरसहा तिचे पालक करीत असत आणि आजहि साधारणत: पालकच करीत असतात. निवडलेला नवरा मुलीला पसंत असावा येथपर्यंत बऱ्याच पालकांच्या उदारबुद्धीनें मजल गाठली आहे. अतिप्रौढ झालेल्या कुमारिकांना आणि नवीन वातावरणांत वाढलेल्या कुमारिकांना त्यांनीं स्वतः वरपसंती करावी अशी मोकळीक त्यांच्या पालकांनीं क्वचित्प्रसंगीं दिलेली आढळते. अशा आजच्या कुमारिकांच्या व उद्यांच्या सर्वसाधारण कुमारिकांच्या उपयोगासाठीं वरपसंतीचें धोरण नमूद करण्याचें योजिलें आहे. अर्थात् वर-पसंतीच्या वेळीं प्रौढ पालकांप्रमाणें निर्विकार मनानें आणि तटस्थ वृत्तीनें कुमारिका निर्णय करूं शकतीलच असा नियम नसतो. पुष्कळ वेळीं त्या बाहेरच्या रूपावर, भपक्यावर फसल्या जाण्याचा संभव असतो; तरीसुद्धां त्यांनीं नवऱ्याची पसंती कोणकोणत्या अपेक्षेनें करावी त्याची माहिती करून घेतली तर त्या फसण्याचा संभव कमी.

स्त्रियांची प्रतिष्ठा त्यांच्या सामाजिक दर्जावर विशेष अवलंबून असते. निदान स्त्रिया आपापसांत तरी संपत्तीच्या मापानें उच्चनीचभाव ठरवीत असतात. मोठ्या अंम्मलदाराची मूढ बायको स्त्रियांच्या जमावांत अध्यक्ष-स्थानीं विराजमान् होईल, तर गरीब पुरुषाची बुद्धिमान् आणि शिकलेली स्त्री जमिनीवर देखील बसण्यास जागा नाहीं म्हणून दाराबाहेरच उभी राहिलेली दिसेल. लग्नकार्यें, सभासंमेलनें, पार्ट्या, सहभोजनें ह्यांत अग्रस्थानीं बसणाऱ्या आणि मिरविणाऱ्या स्त्रिया केवळ त्यांच्या नवऱ्याच्या अधिकाराच्या आणि श्रीमंतीच्या जोरावर मिरवत असतात. फार काय पण चार मोठी मंडळी जेवणा-फराळास बोलाविली, तर अशा प्रसंगीं नित्य उपयोगी पडणाऱ्या गरीब, गुणी स्त्रीला हटकून वगळण्यांत येतें. म्हणूनच मुलींचा ओढा श्रीमंत नवरा मिळविण्याकडे साहजिक असतो. लहानपणापासून मुलीच्या कानांवर आई-बापांचे कोड-कौतुकाचे जे शब्द पडतात त्यांत 'श्रीमंत आणि सुरेख नवरा मिळवून देऊं' असें आश्वासन असतें. बालमनावर याच कोड-कौतुकांचे बोल कायमचे ठसे उमटवितात, कीं ज्यांतून आकांक्षेचे चित्रपट त्यांच्या डोळ्यांपुढें सारखे नाचूं लागतात.

सर्वसाधारणतः मुलींच्या नवऱ्याबद्दलच्या दोनच अपेक्षा असतात; आणि त्या ह्याच कीं, तो श्रीमंत असावा आणि सुरेख असावा; पण ह्या दोन अपेक्षा

संसारसुखाच्या दृष्टीनें अपुऱ्याच काय, पण एकांगी ठरतात. पैसा असूनहि दुःखी असणारीं जोडपीं कांहीं कमी नसतात आणि स्वरूपानें सुरेख असलेला पुरुष मूर्ख, नादान व क्रूरहि असूं शकतो. तेव्हां या दोन बाबती हस्तगत झाल्या म्हणजे संसारसुखाचा स्वर्ग प्राप्त झाला असें मानणें चुकीचें होय. श्रीमंती आणि स्वरूप हीं दुर्मिळ आणि त्यांचा संगम एका व्यक्तींत झालेला जवळ जवळ अशक्य. निदान सर्वसाधारण मुलींच्या आटोक्याबाहेरचें असतें असलें स्थळ. म्हणून नुसती श्रीमंती आणि नुसतें रूप ह्यांनाच भुलून वरपसंती करणें जितकें धोक्याचें तितकेंच तें अप्राप्य कोटींतलें. ह्या दोन्ही गोष्टींना थोडेंसें गौणत्व दिलेलें बरें. ह्याच दोन कल्पनांच्या जोडीला नवरा शिकलेला असल्याबद्दलची अपेक्षा येऊन बसते. शिकलेला असला तरी तो व्यसनी अगर दुःस्वभावी आणि अनीतिमान् नसतो असें थोडेंच! पण समाजांत मनुष्याला प्रतिष्ठा ज्या तीन गोष्टींमुळें मिळते त्या ह्या तीन गोष्टी महत्त्वाकांक्षेचे विषय म्हणून त्यांनीं निवडल्या तर तें क्षम्य ठरेल; मात्र त्यांना चिकटून राहणें हें बऱ्याच वेळीं वेडेपणाचें ठरतें; लग्न न जमून येण्याचें तें कारण होऊन राहतें. या तिन्ही अपेक्षा इतर अपेक्षांबरोबरच बाळगल्यास हरकत नाहीं; पण इतर गुणावगुण न पाहतां ह्या तीन गुणांवरच भाळून जी वरपसंती करील तिच्या पदरांत निराशेंचें माप हमखास पडेल.

लग्न म्हणजे संसार आणि संसार म्हटला म्हणजे कुटुंब. आजचें चिमकुलें व त्यांतून उद्यां फैलावणारें चिमकुल्या जीवांचें मोठें कुटुंब, हें संसाराचें कार्यक्षेत्र होय. पुरुष हा कुटुंबाचा पोशिंदा. कांहीं थोड्या स्त्रिया आज नोकरी करूं लागल्या असल्या तरी नोकरी करणें हें अपवादात्मक व आपद्धर्मच होय. विशेषतः बुद्धिमान्, पुरुषी थाटाच्या, कर्तबगार स्त्रिया सोडून दिल्या, तर सर्वसाधारणतः स्त्रीला घराबाहेरची दगदग ही आपत्तिच वाटते. स्त्रीची लायकी संसारकुशलतेवर ठरवावी तर पुरुषाची लायकी कुटुंबाचें संरक्षण करण्याच्या पात्रतेवरून ठरवावी. कुटुंबाचें संरक्षण करण्यास पुरुषाच्या अंगीं किती तरी निरनिराळे गुण असावे लागतात; त्याशिवाय जीवनकलहाच्या हुल्लडीपासून तो आपल्या पत्नीचें आणि तिच्या पदराखालीं झाकलेल्या कच्च्यांबच्च्यांचें संरक्षण करूं शकणार नाहीं.

जीवनकलहांतील घराबाहेरचा सर्व हल्ला त्याला सहन करावा लागतो, परत फिरवावा लागतो; तर घरांतील जीवनकलहाचे चटके स्त्रीला सहन करावे लागतात आणि तिलाच ते कसेबसे शांत करावे लागतात. पुरुष पराक्रमी तर स्त्री सहनशील असावी, अशी गुणविभागणी त्यामुळें आपोआपच होते. पति हा तेजस्वी आणि पराक्रमी असला पाहिजे. पराक्रम हेंच पुरुषाचें सौंदर्य आणि हेंच त्याचें ऐश्वर्य; आणि विद्येची अखेरची कसोटीसुद्धां हा पराक्रम होय. पराक्रम नसेल तर रूपसुंदर पुरुष हिडिस आणि केविलावणा दिसेल, मूढापेक्षांहि मूढ ठरेल आणि संपत्तीच्या राशीवर बसविला असतांहि तो कंगालाच्या पंक्तीला तेव्हांच येऊन बसेल. हें भयानक चित्र डोळ्यांपुढें उभें राहिलें म्हणजे ज्या कुमारिकांना विद्या, रूप आणि पैसा ह्यांचीच भुरळ पडत असेल त्यांची कींव करावी तेवढी थोडीच वाटते. पराक्रम म्हटला म्हणजे त्याला धैर्याचा पाठिंबा असावा लागतो आणि स्वतःच्या कर्तबगारीचा जबरदस्त अभिमान पोटीं नसेल तर धैर्य तरी कोठून येणार !

अलीकडे 'स्मार्ट' अगर चलाख तरुणच कुमारिकांना आदर्श पति वाटूं लागले आहेत; पण ही चलाखी बहुतेक वेळां पुष्कळशा गुणांचा अभाव दाखवील तर किती तरी त्याज्य अवगुणांना झाकून टाकील. तरुणांनीं चलाख असावें, नाहीं असें नाहीं. पण नुसत्या चलाखीवर भाळून कुमारिकांनीं त्यांची कसून परीक्षा करण्याचें टाळूं नये. त्यांच्या परीक्षेंत तो उतरलाच तर इतर गुणांबरोबर चलाखी हा बेलाशक एक उठून दिसणारा गुणच समजला जाईल. पण प्रेमाची वैषयिक बाजू ही आकर्षणसुलभ आणि बऱ्याच वेळीं उल्लू स्वरूपाची असते. हेंच तें आंधळें प्रेम कीं जें अविवेकाचा पट्टा डोळ्यांवर बांधून स्त्रीला दुर्गुणाच्या आणि हलाखीच्या वणव्यांत आणून सोडतें.

भावी नवऱ्याच्या ठिकाणीं वाईट संवयी अगर व्यसनें आहेत कीं काय ह्याचाहि बारीक तपास कुमारिकेनें जरूर केला पाहिजे. व्यसन म्हणजे निखालस धूळधाणीचा अरुणोदयच. अमुक सवयी वाईट आणि अमुक चांगल्या, ह्या कुमारिकांच्या स्वतःच्या आवडीनिवडीप्रमाणें ठरणार. वाईट संवयी ह्या आपल्या-परी संकोचाची एक अपारदर्शक भिंतच उभयतां पतिपत्नींमध्यें सारखी रचीत असतात, कीं जिच्यामुळें त्यांच्यांतील मनमोकळेपणाची देवघेव कायमची थांबावी.

प्रौढविवाहाच्या मामल्यांत बाहेरख्यालीपणाच्या सवयी तरुणांना जडलेल्या असणें हें अगदीं असंभवनीय नाहीं. अशा या वाईट व्यसनांमुळें संसारसुखाची-च काय, पण तज्जन्य कुत्सित रोगांमुळें मुलाबाळांची नासाडी झाल्याचें भेसूर चित्र कुमारिकांनीं डोळ्यांपुढें आणावें.

नवऱ्यांत पराक्रम, औदार्य, ममता, श्रम, साहस, सत्यनिष्ठा हे गुण असावेत आणि वाईट खोडीं, व्यसनें, कुत्सित रोग हीं नसावींत असें सांगितलें खरें; पण तें कुमारिकांनीं जाणावयाचें कसें? एक तर प्रियाराधनेच्या कालांत कुमारिकेला भावी पतीच्या स्वभावाची, त्याच्या गुणावगुणांची खात्री करून घेण्याची वाटेल तेवढी संधि तिला असते, त्या संधीचा तिनें पूर्ण फायदा करून घ्यावा.

मनुष्याचा स्वभाव, त्याच्या आकांक्षा, त्याच्या आवडीनिवडी ज्या प्रकारच्या असतील त्याच प्रकारचे स्नेहीसोबती त्याच्याभोंवतीं जमत असतात. एका पिसाऱ्याचे पक्षी एकत्र येतात, तसे एक शीलाचे लोक एकमेकांच मित्र होत असतात. त्या मित्रांच्या स्वभावांची पारख स्वतः अगर दुसऱ्याकडून पाहिजे तेवढ्या निर्भीडपणें करतां येणें अवघड नसतें. मित्रांच्या चालचलणुकीवरून नवऱ्याबद्दलची कल्पना करणें अवघड नाहीं आणि तशी कल्पना करणें चुकीचें तर नसतेंच नसतें. पतीच्या कुटुंबाचा पूर्वेतिहास, त्याच्या जवळच्या नाते-वाइकांचीं चरित्रें, ह्यावरूनहि त्याच्या मनावर झालेले संस्कार सहज समजतील. कुलशील पाहण्याची जबाबदारी येथेंच येते. आनुवंशिक गुणांच्या संक्रमणक्षमते-प्रमाणें त्याच्या पूर्वजांचे बरेवाईट गुण त्याच्यांत उतरलेले असावयाचे आणि ते प्रकट झालेले नसले तरी कदाचित् लवकरच त्याच्या ठिकाणीं आणि उद्यां आपल्या अपत्यांच्या ठिकाणीं अवश्यमेव प्रकट होणार, ही जाणीव लक्षांत असूं द्यावी. त्याचें कुटुंब सुखी, समाधानी असेल तर त्याचा स्वभाव शांत आणि उदार असेल. त्याच्या कुटुंबांत कचकच आणि भांडणें असतील तर तो ती भांडणांची परंपरा पुढें चालू ठेवल्याशिवाय राहणार नाहीं.

पण तोच पराक्रमी पुरुष जर क्रूर असेल तर तो कुटुंबाचा पोशिंदा म्हणून त्याज्यच ठरेल. एवढ्यासाठीं त्याच्या ठिकाणीं मनाचें औदार्य आणि ममता हीं भरपूर असलीं पाहिजेत. त्याच्या ममतेच्या सावलीखालीं आणि औदार्याच्या झऱ्यावर तर कच्चींबच्चीं लहानाचीं मोठीं व्हावयाचीं असतात, शिणलेल्या

पत्नीला निवाऱ्याचें विश्रांतिस्थान मिळतें. नवऱ्याच्या ठिकाणीं संग्राहक प्रवृत्ति ही जरूर असली पाहिजे. त्याला स्नेही, नातेवाईक यांचा लोभ संभाळतां येईल तरच तो खुद्द पत्नीकडे आणि आपल्या मुलांबाळांकडे ममतेच्या दृष्टीनें पाहील. त्याच्या ठिकाणीं सत्यनिष्ठाहि तितकीच जाज्वल्य स्वरूपांत पाहिजे; कारण त्याचें वर्तन हेंच तर मुळीं सर्व कुटुंबांतील गुणतेजांचें स्फुरण-केंद्रस्थान ! तो बुद्धिवान् असण्यापेक्षां काटक आणि श्रमजीवी वृत्तीचाच असणें अधिक श्रेयस्कर. नुसत्या बुद्धीस जगांत कौतुकापलीकडे किंमत नाहीं आणि प्रोत्साहनापलीकडे तिला दुसरा मोबदलाहि मिळत नाहीं. जगांत आजवर जे लहानमोठे कर्तबगार पुरुष होऊन गेले ते बुद्धीनें सामान्य पण श्रमानें असामान्य होतें असें दिसून येईल. आणि जगांतील कर्तबगारीचें यश जोंपावेतों पराक्रमाच्या झोळींत जाऊन पडत आहे तोंवर निष्क्रिय बुद्धिमत्तेचा येवढा बडेजाव तरी कां बाळगावा ? उपजीविका चालविणें ही तर जीवनकलहांतील पहिली व अखेरची महत्त्वाकांक्षा; आणि उपजीविका चालविण्याचीहि ज्याच्या अंगांत कुवत नसेल त्याला कधींहि पसंत करूं नये.

सर्व गुणांची मोजदाद आणि पारख ह्याच एका हेतूनें करावयाची, कीं उभयतां पतिपत्नींच्या स्वभावांचा मिलाफ बेमालूम घडून यावा. कुमारिकेचें स्वतःचें जें ध्येय असेल त्या ध्येयाच्या दृष्टीनें जास्तींत जास्त आपणांला मदत करणारा सोबती कोणता हें मनाशीं निश्चित करून त्याप्रमाणें वरपसंती करावी. ध्येय एक तर ती वरपसंतीचें कारण दुसरेंच, अशी विसंगति असली म्हणजे तिच्या त्या संसाराची फरपट विचारायलाच नको ! आपणांकडे कुमारिकांना वरपसंतीचा हक्क हळूहळू मिळणार आहे. ज्या कुमारिकांना तो आज थोडाफार मिळालेला आहे, त्यांनीं आज त्या हक्कांचा किती काळजीपूर्वक उपयोग करावा हेंच वरील विवेचनावरून दिसून येईल. मीं कोणा पुरुषाशीं लग्न लावावें ? असा अस्फुट प्रश्न कुमारिकांच्या मनांत डोकावत असतो; आणि त्याचें उत्तर तिनें काय द्यावें ?; वरील गोष्टींचा विचार करून योग्य ठरेल तेंच निदान तिच्यापुरतें तरी बिनचूक उत्तर होय.

---

# कोणत्या मुलीशीं लग्न करावें? : : १०

प्रत्येक अविवाहित तरुणापुढें 'मी कोणत्या मुलीशीं लग्न करावें?' असा प्रश्न केव्हां ना केव्हां तरी पडत असतो. एखाद्या मुलीची अगोदर गाठ पडली असली तरीसुद्धां, अशक्य अशा आणाशपथांची देवघेव करावयास भाग पाडणाऱ्या आंधळ्या प्रेमाची धुंदी डोळयांवर चढण्याच्या अगोदर, तो तरुण असाच प्रश्न स्वतःला विचारीत असतो कीं, हिच्याशीं मीं लग्न लावावें का? जन्माची जोडीदारीण म्हणून ती योग्य आहे का? आणि ज्या तरुणांची मुलींशीं गाठभेट कधींच होत नाहीं, अशांच्या मनांत तर हा प्रश्न सारखा धुमाकूळ घालीत असतो. बालविवाहाच्या कालीं हा प्रश्न त्यांचे पालक त्यांच्याकरितां सोडवीत असत. पालकांची दृष्टि कौटुंबिक स्वास्थ्याकडे जास्त झुकलेली असे. आजहि पालक त्याला या बाबतींत मदत करण्यास उत्सुक असतात. पण त्यांच्या सल्ल्यावर आणि निर्णयावर तो प्रश्न सोपविण्याचा तरुणाला धीर होत नाहीं. पालक हे, सर्व कुटुंबांत एक नवीन येऊन मिळणारा घटक, ह्या दृष्टीनें मुलीची पसंती करतील, तर तरुणाला स्वतःच्या वैयक्तिक सुखांच्या आकांक्षा पुऱ्या करणारी जोडीदारीण हवी असते. तरुणवृद्धांतील हा दृष्टिभेद एकमेकांनीं चांगला ओळखलेला दिसतो. एक दुसऱ्याच्या निर्णयाच्या आड येत नाहीं आणि दुसरा पहिल्याच्या अभिप्रायावर फारशी भिस्तहि ठेवीत नाहीं.

शंभर टक्के प्रीतिविवाहाच्या पूर्वतयारींत, तरुणास आपल्या भावी पत्नीची, तिच्या स्वभावाची संपूर्ण ओळख करून घेण्यास फारसा वाव सध्यां प्रचलित असलेल्या प्रौढ विवाहांत मिळत नाहीं. प्रौढविवाहास प्रीतिविवाहाची अवश्य अशी महिरप बसविल्याखेरीज तो तितकासा यशस्वीहि होणार नाहीं. प्रीति-विवाह काय अगर प्रौढविवाह काय, दोन्ही प्रकारांत वधूवर आपल्या आवडीनिवडी, आकांक्षा आणि जबाबदाऱ्या ओळखण्यास समर्थ असतात. मुख्य हेतु दोन देहांचा, दोन जीवांचा एकजीव होणें, हा होय. आचारविचार, आकांक्षा, ध्येय, दर्जा, शरीरचना, कामुक आकर्षण आणि वैषयिक तृप्ति, या बाबतींत उभयतांना जेवढें लवकर आणि तंतोतंत समरस होतां येईल, तेवढें तें लग्न यशस्वी होईल.

हें ध्येय कोणाहि तरुणानें दृष्टिआड करून लग्न करणें म्हणजे पैशाच्या लोभाच्या अगर विषयलोलुपतेच्या आहारीं जाऊन संसाराच्या यमयातनेंत उडी घेणें होय. बेकारीच्या दिवसांत पैशासाठीं तरुण आशेला आलेला आहे; पण लग्न म्हणजे पैसे मिळविण्याचें साधन थोडेंच असतें! जो पैशानें विकत घेतां यावयाचा नाहीं आणि ज्याचें पैशांत मोलहि करतां यावयाचें नाहीं, असाच कांहीं विलक्षण सौदा लग्नांत घडून येत असतो कीं, ज्याच्या भांड-वलावर गरीब आणि श्रीमंत स्थितींतील जोडप्यांनीं सारख्याच प्रकारचा बेगुमान आनंद जन्मभर लुटीत राहावें. लग्नाला आलेलें बाजारी स्वरूप हें तरुणांच्या हीन मनोवृत्तीचें द्योतक आणि अपयशी लग्नाचें कारक होय. गरीबीच्या दिवसांत आणि पोरवयांत पैशाचें महत्त्व अवास्तव वाटतें; अमोल अशा अनेक जिव्हाळ्याच्या बाबींकडे मनुष्य कानाडोळा करतो. पैसा हा क्षणिक आणि हातांतून निसटून जाणारा कीं, ज्याबद्दल मनुष्यानें कष्टीहि होतां कामा नये. पण विजोड जोडप्यांची निराशा ही जन्मभर पुरणारी, एकसारखी वाढत जाणारी, सर्व आयुष्याला ग्रासणारी आणि शेवटीं नरकवासाला बरी म्हण-विणारी असते. याकरितां तरुणांनीं वधूपसंतीच्या बाबतींत पैशास अगदीं गौणत्वच द्यावें. ज्यांनीं पैशाचा लोभ केला, ते जन्माचे कष्टी झाले, आयुष्यांत अपयशी ठरले व ज्यांनीं तो लोभ धरला नाहीं, त्याचीं घरें सदैव आनंदानें फुललेलीं दिसतील.

तरुणाची बायकोसंबंधींची अपेक्षा ही मित्रत्वाची अगर जोडीदाराची असली पाहिजे. बायको ही नवऱ्याची केवळ मोलकरीण, अशी स्थिति क्वचित् ठिकाणीं दिसली, तरी ती ध्येयात्मक नव्हे खास. पुरुष आम्हांला नोकर— मोलकरीण समजतात, असा पुरुषांवर हल्ला चालविणाऱ्या विदुषींनाहि हें कबूल करावें लागेल कीं, स्त्री ही मोलकरीणीचीं कामें करीत असते तें घर तरी तिच्याच मालकीचें असतें ना? तें कामहि तिच्याच संसाराचें, म्हणजे तिचें व तिच्या नवऱ्याचें व मुलांबाळांचें असतें ना? (घरांत कामकाज करण्यानें जर स्त्री मोलकरीण ठरूं लागेल, तर बाजारहाट करणारा पुरुष हा त्याच घरांतला गडी ठरेल.) आणि शेवटीं नोकर-मोलकरीण ह्या विडंबनात्मक नात्यानें पति आणि पत्नी हीं जवळच्या नात्यानें एका दर्जांत येतील. येवढें मात्र खरें कीं, घरसंसार स्त्रीला करतां यावा, अशी अपेक्षा तरुणानें बाळगावी. शेंकडा नव्याण्णव जोडपीं मध्यम अगर हलक्या परिस्थितींतील असतात; पुरुषांच्या मिळकतीवर अवलंबून असतात, तेव्हां, आपली भावी पत्नी संसारकार्यांत जितकी तरबेज आणि दक्ष असेल, तेवढी काटकसर आणि टापटीप घरांत राहील. ज्या स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें नोकऱ्या करणाऱ्या असतील त्यांची गोष्ट निराळी. तरी त्यांनीं सुद्धां नोकरींतला अर्धा-पाऊण पगार घरांतील कामें करण्यास ठेवलेल्या गडीमाणसांवर जर खर्च केला आणि नोकरांचे पगार भागविण्यासाठीं काबाडकष्ट केले, तर त्या नोकरीचें चीज काय झालें! ह्यापेक्षां तिनें स्वतः संसारांतील कामें केलीं आणि नोकरांचा पगार वांचविला, तर तें अधिक श्रेयस्कर नव्हे का? तिला विश्रांति मिळेल; तिच्या मुलांबाळांची आबाळ होणार नाहीं. कमावत्या स्त्रीशीं लग्न करण्याच्या अगोदर तरुणानें लग्नानंतर तिनें नोकरी करणें न करणेबद्दल परिस्थिति पाहून नक्की केलेलें असावें. नोकरी सोडण्याचें तिनें कबूल केलें तरी तें तिला पाळतां येईल कीं नाहीं व तें ती पाळील कीं नाहीं ह्याची खात्री केलेली बरी.

घरसंसाराच्या कुशलतेच्या दृष्टीनें अवांतर कलांतील कौशल्य हें गौणच समजावें. गाणें-बजावणें, खेळणें, पोहणें, बोलणें, चालणें ह्यांतील कौशल्य हें वरवर सुख देणारें, दुरून चांगलें दिसणारें, क्षणभर मोहक वाटणारें एवढीच त्यांची किंमत! पण घरांत स्वच्छता, टापटीप आणि काटकसर असेल, तरच तेथेंच समाधान नांदेल. पैसेवाल्यांनीं कलांचें कौतुक केलें, तर तें क्षम्य

ठरेल. तीच गरीबांची कलेची उपासना जर मर्यादेबाहेर जाऊं लागली, तर त्यांचें दारिद्य आणि दुःख हीं उलट दुणावत जातील. खुद्द स्त्रियांच्या दृष्टीनें पाहिलें तरी, त्यांना कलेपेक्षां पैशाचीच किंमत जास्त वाटत असते. विद्वत्ता, बुद्धीची देणगी, त्यांची समाजांतील कर्तबगारी आणि प्रतिष्ठा, ह्यांवर बऱ्याच वेळीं पुरुष आपली अब्रू निभावून नेत असतो. आर्थिक हलाखीबद्दल तो बेफिकीरहि होऊं शकतो. पण बायकांची सामाजिक प्रतिष्ठा श्रीमंतीच्या एकच्या एका अधिष्ठानावर उभारलेली असल्यामुळें त्यांची दृष्टि द्रव्यावर आणि द्रव्याच्या साहाय्यानें विकत घेतां येणाऱ्या ऐश्वर्यावर खिळून राहत असली तर त्यांत नवल नाहीं. एवढ्यासाठीं जिला नवऱ्याची आर्थिक स्थिति ही मानाची आणि दुर्मिळ वाटत असेल, अशीच आपल्यापेक्षां गरीबींतील मुलगी पसंत करावी. जुन्या लोकांची म्हण असे, मुलगी श्रीमंताकडे द्यावी आणि गरीबाची करावी, हें तत्त्वज्ञान अत्यंत शहाणपणाचें होय. श्रीमंताची मुलगी गरीबाच्या येथें मोठ्यांतल्या मोठ्या ध्येयवादाच्या नादीं लागून नांदूं लागली तरी आर्थिक अडचणीमुळें ती मनानें विकल आणि आंतून कष्टी अशीच राहील. स्त्रियांना प्रेमापुढें पैशाची किंमत नसते, असें कितीहि कोणी जीव तोडून सांगोत, द्रव्यशक्तीच्या अडचणीवर जोंपर्यंत सर्व विश्वाचा संसार थाटलेला आहे, तोंवर पुरुष काय अगर स्त्री काय, हीं द्रव्यशक्तीपुढें नमलींच पाहिजेत. द्रव्याच्या बाबतींतहि वधूवरांचा पाहिजे तर समान दर्जा असलेला चालेल. कमीअधिकपणा असावयाचाच तर वधूपक्ष हा द्रव्यानें निखालस कमी प्रतीचा असावा. राजकन्या सावित्री निष्कांचन सत्यवानाकडे आनंदानें राहिली असें खरें मानलें तरी खुद्द, सत्यवानाच्या मनावर वाढत्या संकोचाचा भार किती तरी असह्य झाला असेल ? श्रीमंत मुलीचा गरीब नवरा हा नेहमीं आंतून लाचार आणि ओशाळा असतो. म्हणजे द्रव्यविषयक विषमतेमुळें एकंदरींत दोघांच्या स्वभावसंमीलनांत भलतीच अडचण उत्पन्न होते. जरूर ती मनमोकळेपणाची आणि बरोबरीची वृत्ति त्यांच्यांत उत्पन्न होऊं शकत नाहीं.

आर्थिक दर्जाबद्दल जें म्हटलें, तें सांस्कृतिक दर्जाबद्दलहि तंतोतंत म्हणावें लागतें. उभयतांचा सांस्कृतिक दर्जा अगदीं एक असेल, तरच त्यांच्या स्वभावाचा मिलाफ होईल, अत्यंत बुद्धिवान् पुरुष निर्बुद्ध अशा स्त्रीवर कांहीं वेळ आसक्त होईल, नाहीं असें नाहीं; पण त्या आसक्तींतून बरोबरीचा जोडीदार

मिळाल्याची जी प्रचीति घडणें जरूर असतें ती त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होणार नाहीं. विषयासक्ति ओसरली कीं, बुद्धिवान् पुरुषालाहि 'अरेरे, अगदींच हलक्या बुद्धिमत्तेच्या स्त्रीशीं आपली जिंदगी निगडित झाली आहे' अशी हळहळ वाटल्याखेरीज राहत नाहीं. आपली पत्नी ही आपल्यापेक्षां बुद्धीनें हीन आहे, भावनांनीं रूक्ष आहे, आकाक्षांनीं खुजी आहे, विचारांनीं हिडिस आहे आणि आचारांनीं ओंगळ आहे, अशी जर पुरुषाची खात्री पटूं लागली तर तो तिचा फार तर उपभोग्य वस्तु म्हणून क्षणिक स्वीकार करील, नोकर म्हणून तिला राबवील, पण पत्नीच्या बरोबरीच्या मानमरातबानें तो तिला कधींच वागविणार नाहीं. या दृष्टीनें मिश्रविवाह हे जास्त धोक्याचे आणि अपयशीच निवडतात. जातिसंस्था नकोत असें सर्वांच्या अगोदर मी म्हणेन, पण जातिसंस्था अस्तित्वांत असल्यामुळें जे निरनिराळया दर्जांचे व संस्कृतीचे गट निर्माण झाले आहेत, त्यांच्यांत मिश्रविवाह घडवून आणणें, हें समरसतेच्या व परिणामाच्या दृष्टीनें अपयशीच ठरतें. हा सांस्कृतिक दर्जा ठरवितांना मुलीच्या आईबापांच्या परंपरेकडे पाहणें जरूर असतें. कौटुंबिक इतिहासच त्यांतील व्यक्तिमात्राच्या सांस्कृतिक दर्जाचा भरभक्कम पाया रचीत असतो, मिळवलेल्या विद्येनें आणि कमाविलेल्या आचारानें त्यावर सांस्कृतिक दर्जाची इमारत बांधीत असतो. पाया असेल, त्याप्रमाणेंच वरची इमारत बनणार आणि टिकणार, हें उघड होय. या पूर्वपरंपरेच्या इतिहासास जुने लोक कुलीनपणा समजतात, घरंदाजपणा म्हणून संबोधतात.

शरीररचनेंतहि होतां होईतों अनुरूपता साधणें जरूर असतें. उंच-ठेंगणी, लठ्ठ-कृश अशीं जोडपीं विसदृशतेमुळें खऱ्या संसारसुखाला आणि विषयतृप्तीला आंचवतात. वैषयिक तृप्ति ही जर संसारसुखाची ऐनजिनसी अपेक्षा मानली आणि लग्नसंस्थेचा प्रधान हेतु ही तृप्ति करणें हा गणला तर तुल्यबल वधूवर एकत्र येणें ही एक अनिवार्य अशी अत्यावश्यक घटना आहे. उंच-ठेंगणेपण, लठ्ठ-रोडकेपण हीं वयपरत्वें बदलणारीं असतात. आज दिसणारी चवळीची शेंग चारदोन वर्षांत कणगीचें हिडिस सौंदर्य स्वीकारणार नाहीं ह्याची थोडीच ग्वाही असते ? अगर, आज दिसणारी मध्यम उंचीची मुलगी ताडमाड वाढून नवऱ्याला झाकून टाकणार नाहीं, अशी खात्री थोडीच असते ! आणि ह्याचा

कयास बांधण्यासाठीं वधूच्या कुटुंबांतील इतर माणसांच्या शरीराची ठेवण न्याहाळून पाहावी.

मुलीच्या वडील बहिणी अगर आई शेकाट्याप्रमाणें उंच अथवा भोपळ्याप्रमाणें बेडौल, लठ्ठ असतील, तर त्या मुलीच्या आटोपशीर शरीराचे चालू सौंदर्य केव्हां दगा देईल याचा नेम नसतो! उभयतांचीं शरीरेंहि तुल्यबल अशींच असावींत. सशक्त-अशक्त, रोगी-निरोगी, पंगु-अपंगु, विजोड जोडपीं हीं अपयशी संसाराची। आणि धुळीस मिळालेल्या आयुष्याची जाहिरातच फडकवीत असतात. उभयतांपैकीं कोणीहि रोगट अगर पंगु असेल, तर दुसऱ्यास आजन्म प्राणांतिक हिरमोड सहन करावा लागतो आणि खुद्द त्या दुर्दैवी रोग्यास दुसऱ्याच्या मनांतील असंतोषापासून उत्पन्न झालेल्या तिटकाऱ्याची अवहेलना जन्मभर सहन करावी लागते. लग्न हें पति-पत्नींच्या वैयक्तिक सुखाकरितां असलें तरी त्यांतून अनपेक्षित आणि बऱ्याच वेळीं अनिश्चित वंशवृक्षाचे नवीन अंकुर निसर्गतः फुटत असतात. आपलीं मुलेंबाळें या रोगापासून, शारीरिक व्यंगापासून अलिप्त असावींत असें कोणास वाटणार नाहीं? आनुवंशिक संस्कार, रोग, आणि शरीर-गुणधर्म पुढच्या पिढींत केव्हां ना केव्हां तरी प्रकट होतात, फोफावतात असें आजचें सुप्रजाजननशास्त्र ग्वाही देतें. तेव्हां, पत्नीच्या ठिकाणीं असलेले रोग आणि व्यंगें, आपल्या मुलांत खात्रीनें उतरणार ही मोठीच धास्ती असते. म्हणून, वधूची निवड करतांना तिच्या सर्व अवगुणांकडे, शारीरिक— मानसिक व्यंगांकडे व रोगाकडे जेवढें बारकाईनें लक्ष पुरवावें तेवढें थोडेंच.

या कामीं मुलीच्या कुलाचा इतिहास जों जों बारकाईनें तपासावा, तों तों सत्य शोधून काढण्यास जास्तच मदत होते. क्षय, उपदंश, कुत्सित व्याधि, वेड, बुद्धिभ्रंश, बहिरे-मुके-पण, लुलेपणा, हीं व्यंगें एकदोन पिढ्या टाकूनहि एकदम प्रगट होतात आणि उसळतात. मुलीच्या नखांतहि रोग नसेल, पण तिला तिच्या आईबापांकडून मिळालेला दुर्धर रोगांचा वारसा न जाणो आपल्या अपत्यांच्या ठिकाणीं कदाचित् व्यक्त होईल हें देरकानें लक्षांत बाळगावें; आणि तसें झालें म्हणजे संसाराची इतिश्री झालीच म्हणून समजावी. करितां, वधूच्या शरीरसौष्ठवाबद्दल, निरोगीपणाबद्दल, आचाराबद्दल आणि

विचाराबद्दल पूर्ण छाननी केली पाहिजे, आणि त्यासाठीं तिच्या कुल-वृत्तांताचाहि कसून तपास केला पाहिजे.

तिच्या वागणुकीबद्दलहि तरुणानें आपली पूर्ण खात्री करून घेतलेली असावी. हिंदुस्थानांतील मुली अजून पवित्र आणि मर्यादशील आहेत. त्यांच्या नीतिमत्तेबद्दल यत्किंचितहि शिंतोडा उडविण्याची इच्छा नाहीं; पण शरीराचें आणि मनाचें पावित्र्य ह्यांची नवऱ्यास भलतीच शंका असते, भारी किंमत वाटते. काल बदलला, प्रौढविवाह काय पण अति प्रौढविवाह हा नियम बनला, तरी मन व शरीर ह्यांच्या निखालस पावित्र्याची कल्पना जोंवर बदलली नाहीं, तोंवर ज्यानें त्यानें ह्या नाजूक बाबतीबद्दल स्वतःची अगोदर खात्री करून घेतलेली बरी. लग्नानंतर निराधार कंड्यांवर विश्वास ठेवून पत्नीला भ्रष्ट मानणारे आणि तिला टाकून देऊन स्वतःचें आणि तिचें जन्माचें मातेरें करणारे हलक्या कानांचे संशयी नवरे कांहीं कमी नसतात. जी गोष्ट मागेंपुढें केव्हां तरी भलतीच काळजी आणि कायमचा बेबनाव उत्पन्न करणार, त्या गोष्टीची शहानिशा अगोदर केलेली बरी. निदान, सत्यकथा आणि लोकापवाद ह्यांतील भेद न समजण्यायेवढें संशयी आंधळेपण तरी लग्नापूर्वी आलेलें नसावें.

तरुणाला पडणारा हाच तो बिकट प्रश्न कीं, मीं कोणती मुलगी पसंत करावी ? आणि कोणत्या मुलीशीं मी लग्न करूं ? या प्रश्नाचीं उत्तरें जो तो आपापल्या स्थिति-परिस्थितीनुसार सोडवीतच असतो. पण त्या सर्व परिस्थिती-च्या दडपणाखालीं दडपलेल्या तरुणानें ज्या कांहीं मूलभूत तत्त्वांना उराशीं बाळगून ठेवणें जरूर असतें, अशीं हीं थोडीं तत्त्वें वर नमूद केलीं आहेत. तीं लक्षांत ठेवलीं, तर मी कोणत्या मुलीशीं लग्न करूं, ह्याचें बिनचूक उत्तर त्याला देतां येईल.

## सुरेल स्वभाव : : ११

वैवाहिक जीवनाचा सहकार्य करणें हा एक प्रधान हेतु होय. मनुष्य-मालाच्या ठिकाणीं कांहींशी उपजत आणि बरीचशी विशिष्ट समाजरचनेमुळें ही सहकार्याची भावना उत्पन्न झालेली असते. मैत्री हा मनुष्यप्राण्यांतील विशेषतः उपजत गुण म्हटला तरी त्या मैत्रीच्या जोरावर आणि जरूरीवर समाजघटनेची मांडामांड झालेली असते. तेव्हां पतिपत्नी ह्या एकजीव नात्यांत मैत्रीची अपेक्षा असणें साहाजिकच आहे. मित्रांचे स्वभाव जेवढे जास्त जुळणारे, त्यांच्या आवडीनिवडी जेवढ्या एक दर्जाच्या, दुसऱ्याचे अवगुण पोटांत घालण्याची एकमेकांची जेवढी जास्त तयारी, तेवढी त्यांची मैत्री दृढ होत असते. तर मग पतिपत्नींना एकजीव करून टाकण्यास त्या उभयतांतील मैत्री किती दाट असली पाहिजे व त्यांच्या स्वभावांत किती तंतोतंत एकरूपता असली पाहिजे ह्याची कल्पना सहज होईल.

परस्परांच्या स्वभावांतील तंतोतंत साम्य आणि एकमेकांबद्दल वाटणारा निखालस आदर ज्यांच्यांत वसत असेल, अशीं जोडपीं तुरळक असलीं तरी तीं अक्षय सुखांत नांदत असतात. स्वभावांतील मिलाफ जेथें बेमालुम साधला

आहे, तेथें प्रत्यक्ष स्वर्गीय सुखसुद्धां ठेंगणें वाटतें. पण त्याच्या उलट स्वभावांतील विसंवाद, दारूच्या बाणाप्रमाणें एकसारखे फुटून, दुसऱ्याला होरपळून काढीत असतील, तर तो संसार यमयातनेला बरा म्हणवील. वैवाहिक जीवनाचें यश स्वभावमीलनाच्या अत्युच्च उत्कर्षबिंदूसरशीं वर खालीं आणि कमीजास्त होत असतें.

स्त्रीपुरुषांनीं जणूं काय कार्यक्षेत्रांची वाटणीच केलेली दिसते. घर स्त्रीचें व घराबाहेरचें जग हें पुरुषाचें पराक्रमाचें कार्यक्षेत्र. चालू काळांत स्त्रीपुरुष, हे आजवर समाजानें त्यांच्यावर लादलेल्या, विशेष कार्यांची झपाट्यानें अदलाबदल करीत आहेत. अशा काळीं त्यांच्या कार्यांचीं क्षेत्रें अगदीं निरनिराळीं आणि निरनिराळ्या स्वरूपाचीं अशीं कायमचीं ठरवितां येणार नाहींत. एवढ्यासाठीं कमावत्या स्त्रीनें बिनकमावत्या नवऱ्याला कमी लेखणें अगर अशा नवऱ्यानें आपल्या स्त्रीस फक्त घरांतील व्यवसायांत डांबून ठेवणें आणि तिच्या स्वतंत्र वृत्तीस नियंत्रण घालणें चुकीचें ठरेल. आर्थिक परिस्थितीच्या जिकिरीमुळें दोघांनाहि द्रव्यार्जन करावें लागतें आणि तसें झालें म्हणजे ह्यांपैकीं स्त्रीनें द्रव्यार्जनाशिवाय गृहव्यवस्थेची जबाबदारी किती मर्यादेपर्यंत पत्करावी व पुरुषानें सदर बाबतींत कोठवर बेफिकीरी दाखवावी हाहि एक प्रश्नच पडेल.

निसर्गानें स्त्रीजातीला मातृपदाची न टाकून देतां येणारी जबाबदारी जी कायमची चिकटविली आहे तिची आतां अदलाबदल करतां येणें शक्य नाहीं. दोघांचीं कार्यें अगर कार्यक्षेत्रें एकच असोत अगर घर आणि बाहेरचें जग अशीं उलटसुलट निरनिराळीं कार्यक्षेत्रें असोत, त्यांत एकमेकांची सहानुभूति आणि सहकार्य असलें तरच जीवन सुखाचें होईल. जें क्षेत्र स्त्रीचें अगर पुरुषाचें म्हणून अगदीं निराळें तोडून दिलें आहे, त्या क्षेत्रांतहि कमीअधिक प्रमाणांत एकमेकांनीं बरोबरीनें राबणें जरूर असतें. पत्नी स्वयंपाकपाणी करण्यांत गुंतली असेल तर मुलें संभाळण्याचें काम पुरुषानें करावें व प्रपंचास लागणाऱ्या जिनसांचा बाजार स्त्रीनें स्वतः करावा, अशी परस्परअपेक्षा एकमेकांची असते आणि तसें वागण्यानें दुसऱ्यास थोडाफार हातभार लावल्यासारखें होत असतें.

पुरुषानें घरांत येतांच अगदीं ऐदी मनुष्यासारखें स्वस्थ बसावें अगर स्त्रीनें उंबरठ्याच्या बाहेरील क्षुल्लक कामासाठीं पुरुषाच्या तोंडाकडे पाहत राहावें, ही

वस्तुस्थिति उद्वेगजनक आणि जिगजिग उत्पन्न करणारी होय. दोघांनीं मिळून संसार करावयाचा आणि सुखदुःखाची विभागणी समसमान जर असावयाची, तर जबाबदाऱ्या मात्र कांटेकोरपणें विभागून घेण्यांत हशील काय? सहकार्या-इतकीच सहानुभूतिहि मनें एकजीव होण्याच्या दृष्टीनें महत्त्वाची असते. घरांत अगर घराबाहेर जीवनकलहांत जे परिश्रम उभयतांना करावे लागतात, त्या त्या परिश्रमांचें परिमार्जन सहानुभूतीच्या फुक्या शब्दांनीं होत असतें. अगदीं कर्तव्य म्हणून केलेल्या कार्यांतहि सहानुभूतीचे शब्द हें एक शिणले-ल्याला मिळणारें सर्वांत मौल्यवान बक्षीस होय. तर मग उभयतांच्याकरितां म्हणून केलेल्या कष्टांत सहानुभूतीचा शब्द किती हवाहवासा वाटत असेल याची प्रत्येकानें कल्पना करावी.

पाहुण्यांची उत्तम रीतीनें बरदास्त ठेवून थकलेल्या पत्नीस अगर निर-निराळीं पक्वान्नें करून भागलेल्या भार्येस 'काय सुरेख व्यवस्था ठेवलीस!' अगर 'काय सुरेख जिन्नस झालाय्!' असा एकच ओझरता शब्द नवऱ्यानें म्हटला तरी तिच्या त्या श्रमाचे भरपूर पांग फिटत असतात. सार्वजनिक कार्यासाठीं स्वतःच्या शरीराचा आणि पर्यायानें आपल्या बायकांमुलांचा त्याग करण्यास उद्युक्त झालेल्या वीरास त्याच्या पत्नीच्या सहानुभूतीचा निरोप किती स्फुरण चढवीत असेल! पतिपत्नी एकजीव तर खरींच, पण तो जीव दोन देहांत मिळून वागत असतो; आणि एका देहाला पडणारे कष्ट दुसऱ्या देहाच्या नजरेस पडले, तरच ते दुसऱ्यासमोर रुजू होणार आणि दुसऱ्याच्या सहानु-भूतीचा शब्द म्हणजे श्रम रुजू झाल्याची, कृतज्ञतेची कबुलीच होय.

विवाहोत्तरचा काल जसजसा जास्त लोटत जाईल तसतसें प्रेम कमी कमी वाचाळ होऊं लागतें आणि दुसऱ्या व्यक्तीच्या सेवेंत अधिकाधिक राबूं लागतें. अनुनयकालांतील प्राणांची आहुति देण्याची शपथ वाहणारी, वरवर उसळणारी प्रेमाची लाट पुढें दुसऱ्याचे काबाडकष्ट पाहत असतां फुकाची सहानुभूतिहि व्यक्त न करील तर त्यापरता दैवदुर्विलासच नाहीं. सहानुभूति हा गुणच मनाचा मोठेपणा आणि कनवाळूपणा दाखवितो. निदान विचारीपणा तरी त्यांत दिसून येतोच आणि ही सहानुभूतीची देवघेव तरी एकमेकांत झाली पाहिजे हें उघड होय.

निरनिराळ्या आपत्तींच्या दडपणाखालीं वांकलेल्या संसारी व्यक्तीला सहानुभूतीची फार जरूरी असते. खरा हेतु समजून न घेतां केवळ कार्याच्या अपयशानें दुष्ट हेतु चिकटवून नालस्ती करण्यास बाहेरील जग कंबर कसून उभें असतें. अशा वेळीं संन्निवर्ती माणसाच्या एखाद्याच सहानुभूतिपर शब्दाची संजीवनी त्या निराश व्यक्तीस नवा हुरूप आणते. रोजच्या प्रापंचिक काळज्या इतक्या विविध आणि तीव्र स्वरूपाच्या असतात कीं, उत्साही मनुष्यसुद्धां आपल्या जिवास कंटाळून जातो. उत्तेजनपर शब्दच त्या जिवाला वांचवितात. प्रापंचिक काळज्या आणि अडचणी ह्यांचा वारापाऊस न पोंचेल अशा निवाऱ्याच्या घरट्याकडे प्राणिमात्राचें मन अगदीं आशेनें धावत असतें आणि हें घरटें म्हणजे विश्वांतल्या माणसाचें मन होय. त्याभोंवतीं उत्तेजनपर शब्दांची पसरलेली ममतेची लोकर उपहासापासून, निराशेपासून, त्याचें रक्षण करून त्याचा थकवा घालविते, त्याला पुन्हा कार्यप्रवृत्त करिते, तेव्हां आणीबाणीच्या आणि दुःखाच्याच नव्हे, तर रोजच्या बारीकसारीक काळजीच्या अगर जिकीरीच्या प्रसंगांतहि त्रस्त मनाला उत्तेजन देणें उभयतां पतिपत्नींचें कर्तव्य होय.

पतिपत्नींच्या स्वभावांचा मिलाफ होणें हें बरेंचसें त्यांच्या सांस्कृतिक दर्जावर अवलंबून असतें. दोघेंहि एका सांस्कृतिक दर्जाच्या पातळींत उभीं असतील, तर त्यांचा मिलाफ सहज आणि पुष्कळ बाबतींत न कळत होत असतो. पण हा सांस्कृतिक दर्जा सहजासहजीं एका स्वरूपाचा असणें प्रायः कठीण असतें. बहुतेक सर्व जोडपीं कमीअधिक प्रमाणांत भिन्न भिन्न सांस्कृतिक दर्जाचींच असतात. पण लग्नानंतर सांस्कृतिक दर्जांतील अंतर कमी होत गेलें पाहिजे, तसें तें एकसारखें कमी करण्याचा उभयतांकडून प्रयत्नहि झाला पाहिजे. पत्नी अशिक्षित असेल तर तिला न शिकवितां तशीच वाढूं देणारे आणि गांवढळ म्हणून गप्पागोष्टी मारण्यासाठीं बरोबरीचे स्नेही अगर एखादी विदुषी मैत्रीण यांचे उंबरठे झिजविणारे नवरे दुहेरी दोषी ठरतात. तिला शिकविण्याची जबाबदारी स्वतः पार न पाडणें हा एक गुन्हाच! आणि त्याच एका गुन्ह्याचा आधार घेऊन तिला कायमची तशी अडाणी ठरविण्याचा आणि विचारविनिमयास अयोग्य ठरविण्याचा दुसराहि गुन्हा ते करतात.

सांस्कृतिक दर्जा म्हणजे तरी काय, हें पाहिलें म्हणजे इंग्रजी अगर विश्वविद्यालयीन शिक्षण यांचा सुसंस्कृततेशीं असलाच तर तो फारच क्षीण संबंध असावासा वाटतो. जुन्या परंपरेंतील मर्यादशील आचार, घरांतील इतर माणसांशीं आणि घराबाहेरील पशु-पक्षी-मानव प्राण्यांसुद्धां सर्व जगाशीं वागतांना जी एक मनाची उदार आणि दयाळू प्रवृत्ति ठेवण्याची रीत, ती कोणत्याहि विश्वविद्यालयीन पुस्तकी शिक्षणास फिकीच पाडील. मानवी जीविताचें अंतिम ध्येय आणि भवितव्य जाणून स्वतःबरोबर सर्वजण सुखांत राहतील ह्यासाठीं संयमाचे नीतिनियम पाळून जीवनाला निरनिराळ्या कलांच्या योगानें आकर्षकता आणावयाची, हेंच तर साऱ्या संस्कृतीचें सार आणि हें ज्यानें ओळखलें तो साक्षर असो वा निरक्षर असो, तो सुसंस्कृतच होय.

बऱ्याच असंतुष्ट पतींची पत्नीच्या सांस्कृतिक दर्जाबद्दलची नवीनच तक्रार सुरू झाली आहे म्हणून एवढें लिहिलें. तेव्हां परस्परांचा सांस्कृतिक दर्जा आपापसांतच देवघेव करून एका पातळींत आणावा लागतो आणि ही गोष्ट साध्य व्हावयास दोघांचेंहि एक ध्येय असणें जरूर असतें. दोघांचेंहि ध्येय उदात्त असलें पाहिजे असा आग्रह नसावा आणि असें म्हणण्याचा अधिकार तरी कोणाचा ? केवळ चैनींत दिवस काढायचे हेंच दोघांचें ध्येय असेना; पण तें उभयतांचें एक ध्येय असावें. नवऱ्याचें ध्येय चैनबाजी आणि बायकोचें ध्येय परोपकार, असा ध्येयांचा खटका उडूं लागला म्हणजे जो तो स्वतःचें बौद्धिक जीवन चोरून स्वतंत्रपणें रचूं लागतो. त्यांच्यांतील देवघेव थांबते, सहानुभूति नाहींशी होते, स्वभावांतील विसंगतता झपाट्यानें वाढूं लागते.

उभयतांनीं आपापल्या आवडीनिवडींनाहि मुद्दाम थोडीफार मुरड घालावी. जें आपल्या नवऱ्याला आवडतें तें आपल्याला आवडलेंच पाहिजे असा हट्ट नाहीं, पण त्याच्या आवडीची गोष्ट आपली कायमची तिटकाऱ्याची बाब मात्र असूं देतां उपयोगाची नाहीं. पत्नीला गाण्याचा षोक असला आणि नवऱ्याला गाण्यांत कांहींच समजत नसलें तरी तिच्या गाण्याबद्दल तिटकारा त्यानें दाखवितां कामा नये. उभयतांच्या हौसेच्या बाबती संसारांत हमखास उपयोगी पडत नसल्यानें त्या एकसारख्याच असल्या पाहिजेत असा हट्ट धरणें हेंहि व्यर्थ आहे. प्रत्येकाचे व्यासंग निराळेच असावयाचे. जर एकमेकांनीं कशाला जपावयाचें असेल, तर दुसऱ्याच्या हौसेबद्दल अनुदार प्रवृत्ति न दाखविणें

ह्याच गोष्टीला होय. उलट त्यांतहि उत्तेजनपर शब्द मधूनमधून पेरीत गेल्यास दुसऱ्या व्यक्तीच्याहि ठिकाणीं निराळीच संवेदना उत्पन्न होईल; हौसेच्या बेफिकिरी अतिरेकापासून ती परावृत्त होईल.

पतिपत्नी हीं समाजांत दोन देहांनीं आणि एकजीवानें वावरलीं पाहिजेत आणि दरेक जोडप्याची तशी महत्त्वाकांक्षा असतेहि. नवरा उदार, बायको चिक्कू; अगर बायको परोपकारी, नवरा स्वार्थी; असा वृत्तिभेद जोडप्यांत उत्पन्न होऊं लागावा अगर त्यांच्या विसदृश वृत्तींची प्रसिद्धि अगर चर्चा बाहेर व्हावी हें सांसारिकास कधींच खपावयाचें नाहीं. चांगुलपणा उभयतांनीं वाटून घ्यावा व वाईटपणा शक्य तोंवर झाकून ठेवावा, अशीच उभयतांनीं खबरदारी घेतली पाहिजे. पण कित्येक मूर्ख जोडपीं आपण होऊन ही 'झाकली मूठ' उघडतात, स्वतः एकट्याच्या आत्मप्रौढीच्या हावेनें असलेलेच काय, पण नसलेले काल्पनिक दोषहि दुसऱ्या व्यक्तीस चिकटवितात. चिक्कू म्हणून नवऱ्याची निंदा करणाऱ्या आणि दुष्ट म्हणून पत्नीची निंदा करणारे कांहीं कमी नसतात. अगदीं स्पष्ट शब्दांत निंदाच केली पाहिजे असें नाहीं. पण दोघांच्या जीवनांतील ऐक्यास जेणेंकरून तडा जाईल असे बुद्धिभेदाचे घाव वैवाहिक जीवनाच्या कांचेच्या भांड्यावर त्यांपैकीं कोणीहि कितीहि बारीक मारले तरी त्या भंगलेल्या भांड्यांतून विसंवादाचे बदसूरच उठतील, ते इतके कीं तिऱ्हाईतच काय पण स्वतः तें जोडपेंहि कानांत बोटें घालून एकमेकांस सोडून दूरची वाट धरील.

सामाजिक जीवन हें माणसाला तर कित्येक वेळां जीवनसर्वस्वच वाटत असतें. शरीरसुखापेक्षां कीर्तिसुख विशेष; म्हणूनच कीर्तीसाठीं मनुष्य शारीरिक हालअपेष्टाहि आपण होऊन सोसतो. मानसन्मान, बोलबाला, अब्रू आणि कीर्ति हीं सर्व सामाजिक जीवनाचीं ध्येयें होत. हीं आपल्यास मिळूं नयेत असें कोणास वाटेल ? असें असूनहि एकास सामाजिक जीवन प्रिय तर दुसऱ्यास तेंच अप्रिय असे प्रकार पतिपत्नींत नेहमीं आढळतात. चार मित्रांनीं आपणांकडे यावें असें नवऱ्यास वाटतें, तर पत्नीस तिऱ्हाइतांबद्दल निखालस तिटकारा असतो. नातेवाइकांचीहि गोष्ट तशीच. बायकोस माहेरचे नातेवाईक प्रिय, तर नवऱ्यास आपली नातेवाईक मंडळी प्रिय. अशी सामाजिक जीवनाची फाटाफुटीची फरपट होऊं लागली म्हणजे उभयतांची अब्रू कितीशी टिकणार

आणि शिल्लक राहणार? ज्या प्रकारचें सामाजिक जीवन त्यांना उभयतांना आवडत असेल, त्या प्रकारच्या सामाजिक जीवनांत ते एकजुटीनें भाग घेतील तरच त्यांची अब्रू बचावेल. जगाबद्दल बेपर्वाई ठेवावयाची असेल तरी हरकत नाहीं. मुद्दा एवढाच कीं ह्या ध्येयांत दोघेंहि एकजीव होऊन राहिलीं पाहिजेत.

स्वभावांत अंतर असणें आणि तें सारखें वाढत जाणें हें अनिष्ट तर खरेंच पण कांहीं कांहीं वाईट संवयीमुळें हें अंतर वाढतच असतें. हट्टी स्वभावामुळें दुसऱ्याचें म्हणणें ऐकून घ्यावेंसें वाटत नाहीं आणि दुसऱ्यास कालांतरानें आपलें म्हणणें अशा मनुष्यासमोर मांडावेसें वाटत नाहीं. अतिरागीट स्वभाव हाहि मनुष्याला डोळे बांधून आंधळा करतो आणि त्याला थेट अधःपाताच्या खड्ड्यांत लोटून देतो. बारीसारीक गोष्टींत मनस्वी संताप करून घेणें, हें गृह-शांतीस विधायक आहेच, पण मनाच्या मिलाफास हें मोठेंच घातुक आहे. वेळीं बेफाम रागीट स्वभावहि पुरवला, परंतु घालून-पाडून दुरुत्तरें बोलण्याची सवय फारच चीड आणणारी ठरते, रागाची भरती आणि ओहोटी येऊन गेली, खालीं नितळ मन राहिलें, तर त्यांत फारसें वावगें नसतें. उलट दुसरी व्यक्ति रागाच्या स्फोटास तयार असते. शमनाचे उपाय जय्यत ठेवते आणि शेवटीं स्वभावाच्या मिलाफाबद्दल कधींच साशंक नसते. पण ही दुरुत्तरें करण्याची सवय मात्र भांडणें नसतांहि तिटकारा उत्पन्न करील, अहित न चिंतितां वैर उत्पन्न करील; आणि असंतोषाचे भणभण वारें कुटुंबांत वाहव-यास लावून घरें उध्वस्त करील. वेळीं अवेळीं घालून पाडून बोलणें ही कृतघ्न-तेची कमाल मर्यादाच होय. पति-पत्नी उभयतांहि एकच संसार थाटण्यास उद्युक्त असतात, एकच घर मांडण्यासाठीं अहोरात्र खटपट करीत असतात, एकच सामाजिक अब्रू मिळविण्यासाठीं झीज सोशीत असतात. त्यांपैकीं एका व्यक्तीनें दुसऱ्यास उपमर्दकारक टोंचून बोलावें ह्याचा अर्थ असाच नव्हे का, कीं त्याच्या कष्टाची दुसऱ्यास खातरजमा नसते.

बायकांना घालून पाडून बोलण्याची फार सवय असते आणि त्याबद्दल दोष दिला तर त्या म्हणतील कीं आम्हां बायकांजवळ दोनच काय तीं शस्त्रें! एक डोळ्यांतून पाणी काढावयाचें आणि दुसरें घालून पाडून बोलावयाचें. पैकीं पहिलें कालावधीनें व अतिपरिचयानें हळूहळू निरुपयोगी ठरूं लागतें.

तेव्हां दुसऱ्याचा उपयोग आम्ही कां करूं नये ? कित्येक पुरुषांनाहि इतरांच्या-देखत आपल्या पत्नीस उद्देशून मर्मभेदक बोलण्याची वाईट सवय असते आणि कित्येक अर्धशिक्षित व जुन्या वळणाच्या पुरुषांना तर आपल्या बायकोची पोरकट थट्टा अगर निर्भर्त्सना तिऱ्हाइतांच्या आणि मुलांबाळांच्या देखत करण्याची मोठी हौस वाटते. खुद्द बोलणाराला आनंद होतो असें मानलें तरी ज्याला ती बोलणीं सहन करावीं लागतात, त्याच्या रक्तबंबाळ झालेल्या काळजाकडे उघड्या डोळयांनीं बोलणाराला पाहतां आलें असतें तर त्याचा तो दुष्ट आनंदहि एकदम ओसरला असता.

खोटें बोलण्याची सवय पतिपत्नींत अविश्वास उत्पन्न करते आणि पतिपत्नी एकमेकांशीं बारीकसारीक गोष्टींपासून तों थेट महत्त्वाच्या गोष्टींपर्यंत इतकें सढळ खोटें बोलत असतात, कीं नंतर त्या खोटेपणाला कांहीं ताळतंत्रच राहत नाहीं. मुलांच्या खोड्या लपविण्यासाठीं, नवऱ्याच्या इच्छेविरुद्ध दानधर्म करण्यासाठीं, बारीकसारीक चूक सुधारण्यासाठीं, बायका नवऱ्याशीं खोटें बोलतात; आणि आपल्या मित्रांना साहाय्य करण्यासाठीं, बायकोच्या हौसेचा हिरमोड करण्यासाठीं, आपलीं व्यसनें आणि खर्चिक सवयी लपविण्यासाठीं, पहिल्या बायकोच्या मुलांच्या रक्षणासाठीं, पुरुष बायकोला नेहमीं थापा मारीत असतात; आणि हें उभयतांचें खोटें बोलणें इतकें उघडउघड आणि दुसऱ्यानें ओळखलेलें असतें, तरी सुद्धां दरेक गोष्टीच्या खोट्या सबबी आणि खोटे खुलासे नवराबायको एकमेकांच्या तोंडावर एकसारखे टाकीतच असतात. ह्या सवयीनें एकमेकांबद्दलचा विश्वास उडून जातो आणि मनांतील गुप्त आणि जिव्हाळ्याच्या गोष्टीहि दुसऱ्यापाशीं जपून ठेवण्यासाठीं तीं देण्यास तयार होत नाहींत. परस्परविचार व विश्वासविनिमय थांबतो आणि विचारांचा मिलाफ दुरावतो.

तंतुवाद्य कोणतेंहि घेतलें तरी त्याच्या तारांचे सूर आपोआप मिळालेले नसतात. सर्व तारांतून एक सूर व सहसंवेदना उत्पन्न होत असतील तरच त्या सुरेल वाद्यांतून निघणाऱ्या निरनिराळ्या उत्तमोत्तम चिजांची उधळपट्टी करतां येईल. सूर लावले नसले, तर त्या वाद्यांतून कर्कश अगर रडके बदसूरच निघत राहून इतरांचाहि हिरमोड करीत राहतील. एकसूर अगर सहसंवेदना होण्यासाठीं कांहीं तारा खालीं उतराव्या लागतात. हीच ती तारांची आप-

आपसांतील देवाणघेवाण; आणि ही जेवढी बेमालुम आणि झटपट होईल, तेवढी गायनाला लवकर सुरुवात होईल, तेवढा अधिक रंग त्यांत पैदा होईल. दिलरुब्याच्या पांचपंचवीस तारा आपणांला दिसतात, पण ऐकूं येतो सर्वांचा मिळून एकच स्वर!

हेंच उदाहरण पतिपत्नींच्या स्वभावसंगतीविषयीं तंतोतंत खरें आहे. उभयतांमधील मूळचें अंतर तोडण्यासाठीं देवघेवीच्या खिलाडू वृत्तीनें त्यांनीं कसून प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठीं कुणाला दोन पावलें मागें यावें लागेल, तर कुणाला लांब उडीहि मारावी लागेल. त्यांच्या स्वभावांतील अनंत आवडीनिवडीचा मिलाफ होऊन त्या सर्वांतून एका ध्येयाचा एकच एक सूर निघाला पाहिजे. तारा लावावयाच्या त्या मुळीं गायनाची पूर्वतयारी म्हणून! पतिपत्नींना संसाराचा गाडा पाठीवर वाहावयाचा असतो, अनेक सुखदुःखांचे प्रसंग पायाशीं पाय बांधून काढायचे असतात आणि या त्यांच्या जबाबदारीची पूर्वतयारी म्हणजे ही स्वभावमीलनाची आवश्यकता.

ज्यांना हें लवकर साधलें ते वैवाहिक जीवनाच्या थंड छायेंत बसून ऐहिक आपत्तींचा उन्हाळा लीलेनें काढीत असतात. पण ज्यांचा सर्व जन्म नुसता घरगुती समेट घडवून आणण्यासाठीं खर्च झाला, अशांना रखरखीत आपत्तींपासून बचावाचा दुसरा आसराच नसतो. एकीचें महत्त्व दोन अथवा अनेक घरांत जर येवढें, तर एका घरांत तिचें किती महत्त्व वर्णावें! नाहींतर मरेपर्यंत भांडत राहून स्वतःस व दुसऱ्यास सळो का पळो करून सोडणारीं दांपत्यें कांहीं कमीं नसतात. पतिपत्नी कसलीं हीं? जन्मवैरीच तीं!

---

# शिकलेली सवत : : १२

अहमदाबाद येथील सुप्रसिद्ध सुधारक घराण्यांतील विदुषी कु. विनोदिनी, एम्. ए., या बाईनीं श्रीयुत मनुभाई यांच्याशीं लग्न केलें. त्यामुळें गुजराथेंत घरोघर त्वेषाचे उद्‌गार निघाले. श्रीयुत मनुभाई यांची पहिली पत्नी सौ. शारदा ही वयांत असून तिचीं दोन मुलेंहि हयात आहेत. या लग्नाबद्दल येवढा गिल्ला माजण्याचीं अनेक कारणें आहेत. त्यांतच शारदेला–पहिल्या पत्नीला–सवत आली. तिच्या संसाराचें मातेरें झालें याबद्दल कींव आणि चीड लोकांच्या मनांत उत्पन्न झाली. अनेक बायका करण्याची पुरुषांना जी हिंदुधर्म-शास्त्रानें मुभा ठेविली, त्या सवलतीच्या झिंज्या उपटून तिला अगोदर ठार करा असा हट्ट धरण्याइतकें लोकमत अजून सुसंस्कृत झालेलें नाहीं. विनोदिनी-सारख्या सुशिक्षित कुमारिकेनें शारदेच्या संसाराची राखरांगोळी केली तें बरोबर नाहीं. मनुभाईनें विनोदिनीच्या नादीं लागणें हें उचित नव्हतें, असे त्या जोडप्याचे वाभाडे दरेकजण काढीत आहे; पण हें लग्न मनुभाई व विनोदिनी यांना कां करतां आलें तें कारणच, म्हणजे बहुपत्नीकत्व, निवडून त्यावर हल्ला करण्याचें कोणाच्या मनांत येत नाहीं, कोणाच्या आलें तरी बोलून दाख-

विण्याचें धैर्य होत नाहीं. शिकलेली सवत पहिल्या पत्नीच्या उरावर नांदायला घरांत येण्याचे दाखले गुजराथेंत नवीन असले तरी महाराष्ट्रीय समाजाला ते पुष्कळ जुने आहेत. रत्नप्रभा म्हणून कोण्या विदुषीनें मोठ्या बहिणीच्या नवऱ्याशींच लग्न लावल्याचें उदाहरण पूर्वी पुण्यास घडून आलेलेंच आहे. त्याशिवाय गेल्या दोनचार वर्षांत विदुषी कुमारिकांनीं विवाहित पुरुषांशीं लग्नें लावल्याचीं अगर उघडउघड प्रेमसंबंध ठेवल्याचीं उदाहरणें बरींच उघडकीस आलीं आहेत. हे प्रकार समाजाला हीनत्व आणणारे, गरीब गृहिणींच्या अन्नांत माती कालविणारे तर खरेच; पण विशेष उद्वेगकारक गोष्ट ही कीं, शिकलेले व स्वतःस समाजसुधारक म्हणवून घेणारेच असल्या फंदांत गोवले जातात. स्वैराचाराच्या नव्या नीतीचा पुरस्कार करण्यासाठीं अनैतिक व त्याज्य अशा जुन्या बहुपत्नीत्वाच्या सवलतीचा फायदा घेणारे हे जातीनें सुधारक का दुर्धारक? नव्याजुन्यांतलें त्याज्य तेवढेंच हे नामधारी सुधारक नेमकें कसें उचलतात कोण जाणे?

तें कांहींहि असो, परंतु हे प्रकार दिवसेंदिवस उजळ माथ्यानें बोकाळत आहेत, वाढत आहेत आणि आपल्या भूकंपाच्या धक्क्यानें संसारी स्त्रियांच्या गृहसौख्याच्या ठिकऱ्या उडवून देत आहेत. विवाहित पत्नीवर हें निराळेंच संकट ओढवलेंसें वाटतें. अविवाहित विदुषींचीहि त्यांत दारुण निराशाच आहे. तेव्हां विवाहित-अविवाहित या दोन्ही स्त्रियांच्या दृष्टीनें याचा विचार केला पाहिजे.

पुरुषाची खेळकर वृत्ति खुलविणारी, वैचित्र्याची आवड पुरविणारी, सौंदर्याची भूक भागविणारी वागणूक ज्या विवाहित स्त्रियांची नसेल त्यांच्या स्वाधीन नवरे राहणें दिवसेंदिवस दुरापास्त होत जाणार खास. कृत्रिम साधनांनीं गजबजलेल्या आधुनिक प्रवृत्तिपर दुनियेंत मनुष्यास म्हातारपणाची दिक्कत वाटेनाशी झाली आहे. वयानें वाढला तरी प्रवृत्तीनें तो जागच्याजागींच उभा राहून हावरट तारुण्याची पाटी तो सोडीत नाहीं. व्यक्तिमाहात्म्याच्या अमर्याद वाढीबरोबर दरेकजण स्वतःच्या सुखापुढें दुसऱ्या कसल्याहि जबाबदारीची मातबरी चालूं देईनासा झाला आहे. नैसर्गिक क्षुधा (विषयाची, पोटाची,) हरेक प्रकारें आणि हरेक मार्गांनीं शमविणें हा धर्म होऊं लागतांच

नैतिक जबाबदाऱ्या फिक्या पडूं लागल्या आहेत. हा चालू युगाचा महिमा आहे. त्याची मोजदाद भगिनीवर्गानें घेतली नाहीं, तर त्यांत नाश त्यांचाच होणार आहे. पुरुषाचें आयुष्य घराबाहेरील गोष्टींनीं सारखें घडविलें जात असतें. पुरुष हा बुद्धीनें, आकांक्षेनें व ज्ञानानें सारखा वाढत असतो. त्याच्या पावला-बरोबर पाऊल टाकीत झपाट्यानें चालणारी सहचारिणी त्याला लाभली तर तो तिला बरोबर घेऊन जात असतो. मात्र ती रेंगाळत असली, अगर मुलांबाळांच्या घोळक्यांत अप्रबुद्धपणें चूर झालेली असली तर तिला आपोआपच मागें राहण्याची वेळ येते. स्त्री ही पुरुषाप्रमाणें आकांक्षेनें वाढत नाहीं, उलट अनुभवानें ती लवकर पोक्त बनते, संसाराच्या खस्ता खाऊन ती दमते, मुलांबाळांच्यामुळें ती थकलीभागलेली होते; थोडक्यांत तिच्या अंगांतील हुरूप, हौस, लोलुपता, आतुरता, कमी होऊन वेळीं ती उदासीनसुद्धां होते. तिची सर्वांगीण वाढच खुंटल्यासारखी दिसते. हा विषम प्रकार उभयतांच्या वाढीचा असल्यानें दोघे जरी प्रवास करण्यास बरोबर निघालीं तरी साहजिकच स्त्री ही मागें राहते. अशा वेळीं पुरुषास जर नवीन तरुण मैत्रीण भेटली तर हवीच असते. कदाचित् तो अशा मैत्रीची मनापासून इच्छा करीत असतो. पुरुष ज्या मानानें सुसंस्कारी व महत्त्वाकांक्षी आणि ज्या मानानें त्याची पहिली पत्नी अप्रबुद्ध व उदासीन, त्या मानानें तो तरुण शिकलेल्या स्त्रियांच्या पाशांत अधिकाधिक सापडतो. खरें म्हटलें तर तो स्वतःच्या जाळ्यांत अशा सुशिक्षित कुमारिकांना अडकवून फसवितो. हें या प्रश्नाचें अचूक मानसशास्त्र झालें. अर्थात् असे पुरुष नैतिक दृष्टया अत्यंत टाकाऊच म्हणावे लागतील. पत्नीला सुबुद्ध आणि तरबेज करणें, तिच्या थकलेल्या मनास व दमलेल्या शरीरास हुरूप आणणें, हीं जबाबदारीचीं कामें पतीनें केलीं पाहिजेत, तेव्हां स्वतःच्या बेफिकिरीचा फायदा त्याला घेतां येणार नाहीं.

पण येवढें खरें कीं, सुवासिनींनीं स्वतःची व स्वतःच्या पतीची खबरदारी घेतली पाहिजे. पतीच्या आवडीनिवडींकडे दुर्लक्ष करणारी पत्नी त्याला दुसरी-च्या हातीं आपण होऊन नेऊन सोडते. स्वतःच्या सौंदर्याकडे, आकर्षकत्वाकडे, बौद्धिक वाढीकडे, जी स्त्री दुर्लक्ष करते, ती पतीला स्वतःपासून दूर लोटीत असते. दूर लोटलेल्या पतीला सहानुभूतीचा आसरा दिसतांच तो त्याच्या निवाऱ्याला गेला तर त्यांत त्याला दोष फारसा देतां येत नाहीं. तेव्हां हें

सुशिक्षित सवतीचें संकट टाळण्यासाठीं संसारशास्त्राचें कठीण व्रत दरेक सुवासिनीनें केलें पाहिजे.

शिकलेली सवत लग्न लावून घरांत येऊं शकते याचें कारण आपलें जुनें धर्मशास्त्र आणि बहुपत्नीकत्वाची चाल होय. तेव्हां जुन्याला चिकटून राहण्यानें-च स्त्रिया रसातळाला जाऊन पोंचतात. हिंदु पतीला वाटेल तेवढ्या बायकांशीं लग्नें लावण्याचा हक्क कायद्यानें देऊन ठेवला आहे. त्यामुळें परस्त्रीच्या प्रेम-पाशाची पकड एखाद्या हिंदु पतीवर पडली तर तो धीर ठेवून खुशाल तिला लग्नाची बायको म्हणून राजरोस घरांत आणतो. चोरट्यानें व्यवहार आजवर होता, तो उघड उघड साळसूदपणें सुरू होतो. समाजाला कांहीं बोलतां येत नाहीं, कांहीं बोलावेंसें वाटतहि नाहीं. लग्न न झालेली ठेवलेली बाई आज ना उद्यां तरी सुटेल, पति पुनः संसारांत मन घालतील, अशी सुवासिनींना जी एक आशा करण्याला जागा असते, तीहि ह्या बहुपत्नीकत्वाच्या चालीनें नाहींशी होते. तेव्हां यावर उपाय म्हणजे दरेक स्त्रीचें लग्न रजिस्टर पद्धतीनें स्पेशल मॅरेज ॲक्टखालीं झालेलें असावें. आजची सौभाग्यकांक्षिणी कुमारिका, उद्यांची सुवासिनी होणार आणि प्रसंगविशेषीं तीहि तितकीच शिकलेल्या सवतीच्या भीतीनें केविलवाणी होणार आहे. पुरुषानें अनन्य प्रेमाच्या शपथा घेतल्या तरी 'अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम' असें आपण प्रत्येक देवाला म्हणतों, तशीच पुरुषांतील कामुक वृत्ति प्रत्येक नवीन तरुणीस अनन्य प्रेमाच्या आश्वासनांची पूजा बांधीत असते; म्हणून त्यांच्या आणाशपथांवर फारसें विसंबून राहूं नये. रजिस्टर लग्न केलें कीं, त्या पुरुषाला एक पत्नी हयात असतांना दुसरें लग्न तरी करतां येत नाहीं. तसें त्यानें लग्न केलेंच तर त्याला शिक्षा होऊन दुसरें लग्न गैरकायदेशीर ठरतें. एकदां जागा रिझर्व्ह केली मग आपण जरी त्यावर जाऊन बसलें नाहीं तरी दुसरा तरी कोणी त्यावर जाऊन बसणार नाहीं. तशाच प्रकारें रजिस्टर पद्धतीनें एका पत्नीसाठीं तो पुरुष रिझर्व्ह म्हणून समजला जातो. त्याच्या प्रेमाची मालकीण त्याची लग्नाची पत्नी जरी झाली नसली तरी दुसरी प्रेमाची मालकीण त्याची पत्नी तरी होऊं शकणार नाहीं. हा कांहीं कमी फायदा नाहीं. जुन्या परंपरेवर स्त्रिया भिस्त ठेवून आहेत पण ती परंपराच अखेर त्यांचा गळा कापते.

अविवाहित मुलींच्या आईबापांनीं यापासून धडा घेण्यासारखा आहे. सुशिक्षित मुलींनीं सवतीवर एखाद्या बिजवराशीं लग्न लावण्यास तयार व्हावें ही शिक्षणाची, लाडाची, महत्त्वाकांक्षेची केवढी निराशा आहे? पण यासहि कारणें अनेक आहेत. तीं कारणें दूर केलीं पाहिजेत. त्याशिवाय असल्या अनुचित प्रकारांस आळा बसणार नाहीं. आपणांकडे मुलीच्या लग्नाच्या पद्धतीबद्दल स्पष्ट अशी कल्पना कोणाचीच नसते. प्रीतिविवाह करावा असें म्हणणारे मुलीचे बाप पुष्कळ असतात; पण त्या दिशेनें प्रयत्न करणारे त्यांपैकीं किती आहेत? प्रणयविवाह घडवून आणण्याच्या कामीं मुलींपेक्षांहि मुलींच्या वडील मंडळींना फार दगदग पडते. आपल्या ओळखीपाळखीचे संभावीत तरुण मुलगे निवडून काढले पाहिजेत, त्यांची आणि मुलींची ओळख झाली पाहिजे, उभयतांचा स्वभाव जुळतो कीं नाहीं, परस्परांत आकर्षण उत्पन्न होणारे समान अगर विरोधी गुण जमतात कीं नाहीं, ह्यांची चांचणी केली नाहीं व तशा प्रकारचे प्रसंग घडवून आणिले नाहींत आणि नुसतें प्रीतिविवाह झाले पाहिजेत, असें तोंडानें हजार वेळां म्हटलें तर तेवढ्यानें काय काम होणार आहे? तरुण, अविवाहित विद्यार्थ्यांची आणि आपल्या मुलीची गांठ पडूं न देण्याची कोण खबरदारी आपण घेतों! आणि यामुळेंच मुलींना आपण कोंदट, सोवळ्या, अलिप्त अशा वातावरणांत वाढवितों. पुरुषजातीची आपण तिला मुळीं ओळखच होऊं देत नाहीं. चांगला कोण, वाईट कोण, उदात्त कोण, नीच कोण, सुस्वरूप कोण, कुरूप कोण, अशक्त कोण, सशक्त कोण, यांची निवड वयांत आलेल्या मुलीला केव्हां करतां येईल? तर, जेव्हां तिच्या पाहण्यांत एकापेक्षां अनेक तरुण आले असतील तेव्हां. पुरुषांच्या वाऱ्यापासून दूर निवाऱ्यांत वाढविलेल्या आमच्या मुली पहिल्यानें ज्या पुरुषाच्या निकट संबंधांत येतात त्यावरच त्या लुब्ध होतात. आजच्या परिस्थितींत मनमोकळेपणानें जर तरुण मुलींना कोणाशीं उघडपणें वागतां येत असेल तर ते कुटुंबवत्सल पुरुषाबरोबर होय. समाज त्यांच्या बोलण्याबसण्यास हरकत घेत नाहीं. पहिल्या पत्नीची मैत्रीण म्हणूनच बहुतेक वेळीं तिचा त्या कुटुंबांत प्रवेश होतो. पत्नीच्या वशिल्यानेंच ती तिच्या पतीशीं बोलूं लागते, घरांत वावरूं लागते आणि पत्नीच्या भिडेमुळेंच ती वेळीं अवेळीं तिच्या घरीं राहूं पण शकते. खुद्द पत्नीला त्या दोघांचा संशय येण्याच्या अगोदर त्यांचें

जमूनसुद्धां गेलेलें असतें. मुलींना पुरुषांशीं सोबतस्नेह करावासा स्वभावतः वाटतोच. त्यांतून आजवर इतक्या मनमोकळेपणानें दुसऱ्या कोणत्याच पुरुषाबरोबर त्यांना बसण्याबोलण्याची संधि आलेली नसते. तेव्हां ती फसणें साहजिकच असतें. विवाहित पुरुष हा स्त्रीहृदयाचा अचूक ठाव घेणारा पट्टाईत पाणबुड्या, प्रणयशास्त्रांतील वाकबगार, वावगी सलगी करण्यास मागेंपुढें न पाहणारा, धाडसी असा बनलेला असतो आणि अशाशीं मुग्ध कुमारिकांची भेट पडल्यावर त्या सहज फसतात. त्याच्या ऐश्वर्यानें, चतुराईच्या बोलण्यानें, आस्थेवाईक वागणुकीनें, त्याच्यावर भाळलेल्यांना तर तो कसा, केव्हां आणि कोठवर फशीं पाडील याचा नेमच नसतो. शिकलेली सवत ज्या ज्या घरांत दाखल झाली आहे, त्या त्या घरांत हेच प्रकार आढळतील. पतीचें मन एकसारखें वेधून घेण्यापुरतें कसब पहिल्या पत्नींत नसेल, सुशिक्षित कुमारिकेला तिनेंच आणलें असेल, पुरुषांच्या मोहजालांत ती सापडून फसली असेल आणि पुरुष प्रामाणिक, कनवाळू असेल म्हणूनच त्यानें त्या फसलेल्या कुमारिकेशीं लग्न लावण्याचें क़बूल केलें असेल. अविवाहित तरुण प्रणयव्यापारांत उल्लू तर खराच, पण या प्रांतांत तो नवखाच असतो. स्त्रियांचीं मनें मोहित करण्याची कला त्याला माहीत नसते. आपलें मत बोलून दाखविण्याचें धैर्यहि त्याला होत नाहीं, इतका तो भिडस्त असतो. त्याच्या अगदीं वैषयिक प्रेमाच्याभोंवतीं ध्येयवादाचें वलय असतें. तर विवाहित पुरुष ध्येयवादाची ऊब ओळखून अगदीं शंभर टक्के वैषयिक आकांक्षांचा भोक्ता बनलेला असतो. अविवाहित तरुण हृदयदेवीचा अधःपात न व्हावा म्हणून काळजी वाहत असतो, निदान तसें तो तरुणीस बोलून दाखवून तिला जागें तरी करीत असतो. विवाहित पुरुषाची स्त्रियांकडे उपभोग्य वस्तु म्हणूनच पाहण्याची दृष्टि बनलेली असते. तिच्या अधःपाताची तो फारशी पर्वा करीत नाहीं. फार काय, पण परिणामाचें भेसूर चित्रहि तिच्या मनांत डोकावूं नये अशा सफाईनें तो तिला खेळवीत असतो. विवाहित पुरुष कुमारिकेच्या कोंवळ्या सौंदर्यावर झडप घालण्यासाठीं टपून बसलेला असतो, तर मुग्ध सौंदर्याचा पूजक बनलेला तरुण त्याच्या दिव्यत्वाचा आपल्यावर अनुग्रह व्हावा म्हणून मनांत झुरत असतो. एवंच, विवाहित पुरुषांपेक्षां अविवाहित तरुण हजार पटींनीं चांगले असतात. त्यांच्याशीं मुलींना मोकळेपणानें वागूं देणें हें हजार पटींनीं कमी धोक्याचें

आणि येऊन जाऊन धोका तरी काय असा पोंचणार आहे ? फार झालें तर त्यांच्यावर लग्न करण्याची वेळ येईल येवढेंच ना ? आणि त्यांत अवघड तें काय ? अशा लग्नांनीं सुवासिनींचीं घरें मोडण्याची पाळी तर येत नाहीं ना ?

सुशिक्षित सवत हा प्रश्न सुवासिनींच्या दृष्टीनें जेवढा भीति उत्पन्न करणारा आहे तितकाच सुशिक्षित कुमारिकांच्या दृष्टीनेंहि तो फार भयप्रद आहे. या घटनेच्या बुडाशीं असलेलीं कारणें शोधून काढून तीं नाहींशीं करण्याची खटपट समाजानें केली नाहीं आणि दरेक सुशिक्षित सवत होण्याच्या प्रसंगीं उगीच अकांडतांडव करीत राहिलें तरी त्याचा काय उपयोग होणार आहे ?

---

# पुरुषास बिघडविणारी कोण ? घरची कीं दारची ? : : १३

तसें पाहिलें तर, माझ्या मित्राची बायको रूपानें नक्षत्रासारखी आहे, बुद्धीनें चलाख, संसारांत दक्ष, मुलाबाळांची जोपासना आणि आजारी माणसांची शुश्रूषा करण्यांत पटाईत अशी सात्त्विक, पतिसेवापरायण आहे. असें असतांहि तो माझा मित्र दुसऱ्या बाईच्या नादीं लागला आहे. ती बाई नुसत्या रूपानें पाहिली, तरी माझ्या वहिनींच्या (मित्राच्या बायकोच्या) पासंगाला पुरणार नाहीं. स्पष्टच बोलावयाचें, तर ती वहिनींची मोलकरीणहि शोभणार नाहीं. वहिनींसारख्या सुस्वरूप आणि आदर्श आर्यपत्नीस टाकून, माझ्या मित्रानें एका यःकश्चित् स्त्रीच्या नादीं लागावें याचा मला अतोनात राग आला. माझा मित्र हाहि कांहीं उल्लू,उनाड व मवाली वृत्तीचा नव्हता. त्याच्या नैतिक कल्पना व कोमल भावना यांची मला पूर्ण माहिती होती. तेव्हां तर मला त्याच्या या वृत्तीचें मोठेंच गूढ पडलें. वहिनींनीं गोष्टींवरून गोष्ट काढून मला तो प्रकार जेव्हां सांगितला, तेव्हा मी त्यांना 'आजवर कां कांहीं सांगितलें नाहींत ?' असें

विचारलें. 'पुष्कळ दिवस सांगणारच होतें; पण संधीच आली नाहीं.' हें त्यांचें उत्तर ऐकून त्यांच्या सहनशील विनयाची मला कींव आली. त्याच दिवशीं मी माझ्या मित्राची एकांतांत चांगली कानउघाडणी केली. मैत्रीचा संबंध तोडून टाकण्याचा मीं धाक दाखवितांच त्याचा चेहरा गोरामोरा झाला आणि तो अगदीं केविलवाणा दिसूं लागला. 'अजून हा माणुसकीस विसरला नाहीं! मैत्री तोडली तर त्याला माणसांतून उठण्यास वेळ लागणार नाहीं; मैत्रीच्या गळानें आज ना उद्यां अधःपाताच्या तळांतून त्याला वर ओढून काढतां येईल,' असें माझ्या मनांत आले; माझा अर्धा राग शांत झाला. मी पड खाल्ल्याचें दाखविण्याच्या अगोदरच तो सद्गदित होऊन म्हणाला,

"खरं कारण सांगितलं तर तुला पटणार नाहीं; पण खरं विचारशील तर हिच्यांत जिवंतपणाच नाहीं. स्पष्ट सांगूं? आकर्षक स्त्रीत्वच हिच्यांत नाहीं. त्यांत माझा दोष तर आहेच, मी कबूल करतों; पण म्हणून मीं तिची अवहेलना कधींहि केलेली नाहीं."

त्याचें तें उत्तर मला चमत्कारिक तर वाटलेंच. अगदीं पूर्वीप्रमाणें वहिनींशीं, मुलांबाळांशीं, घरीं अगदीं प्रेमळपणानें व आनंदानें तो वागतो, ही गोष्ट नाकबूल करण्यासारखी नव्हती. मित्रानें काढलेल्या उद्गारांच्या दुर्बिणींतून मी वहिनींकडे निरखून पाहूं लागलें. हळूहळू कांहीं तरी निराळेंच दृश्य, कोणी तरी निराळीच बाई, कांहीं तरी निराळाच संसार मी पाहत आहे असें मला वाटलें. आमच्या वहिनी इतक्या रेखीव, गोऱ्या आणि सुंदर होत्या, कीं मी आजवर त्यांना मनांतून एखाद्या सुंदर पुतळीप्रमाणें समजत होतों आणि खरोखरच आज त्या मला अगदीं थेट एखाद्या संगमरवरी पुतळ्याप्रमाणें सुंदर, रेखीव, पण तितक्याच निर्जीव दिसूं लागल्या. त्यांची पतिसेवा, त्यांचें व्यवहारकौशल्य अगदीं निर्दोष खरें; पण त्यांत हौस दिसत नव्हती, त्या चिमुकल्या संसाराचें वातावरण शुद्ध, सात्त्विक, पण त्यांत वहिनींच्या आकर्षक वागणुकीचा उल्हास अगर चमचमाट नसल्यानें तें कोंदट व उदास दिसूं लागलें. वहिनींच्या वागणुकींत इतकें गांभीर्य, इतका सोशिकपणा आणि इतका विनयशीलपणा आहे, कीं माझ्या मित्राचीच काय, पण त्याच्या लहान मुलांचीहि खेळकर वृत्ति जागच्या जागीं थिजून जावी. वहिनींचा निर्दोष सात्त्विकपणा आणि

त्यांच्या चिमुकल्या संसाराचें गंभीर वातावरण यांमुळें आपण कोपिष्ट कार्तिकस्वामीच्या समाधीशींच भीतभीत उभें आहोंत असें वाटूं लागतें. वहिनींच्यांत चिडखोरपणा, विनोद, रुसवा, छचोरपणा, टोंचून बोलणें, चंचलत्व, नटणें-मुरडणें असतें तर या दरेक पैलूगणिक हिऱ्याच्या वाढत्या चमचमाटानें त्या आकर्षक दिसल्या असत्या. आणि माझा मित्र त्यांच्या तेजोवलयाभोंवतीं पंतगाप्रमाणें जन्मभर घिरट्या घालीत राहिला असता. असें माझें मलासुद्धां वाटूं लागलें. मित्राला, जो जिवंतपणा, आकर्षक सजीवपणा पाहिजे होता, तो आमच्या वहिनींना दाखवितां आला नाहीं. जिथें तो जिवंतपणा दिसला तिकडे तो धावत गेला; यांत माझ्या मित्राचा उल्लूपणा असला तरी त्याला कारण वहिनींचीच वागणूक होय.

माझ्या मित्राची प्रवृत्ति आणि वहिनींची ही अवस्था अपवादात्मक नसून ही सार्वत्रिक आढळून येणारी परिस्थिति आहे. बाहेरख्याली बहुतेक पुरुषांच्या बायका सुस्वरूपच काय, पण सुस्वभावी असतात. त्यांच्या गुणांचा हा असा मोबदला नवऱ्यांकडून मिळावा हें दुर्दैव तर खरेंच; तथापि त्या प्रकारासहि कांहीं व्यावहारिक कारणें आहेतच. तीं कारणें कोणतीं व त्यावर उपाय कोणते, हें प्रत्येक संसारी स्त्रीस समजणें जरूर आहे.

पुरुष कितीहि सुसंस्कृत झाला तरी त्याचे थोडे-फार प्रकृतिधर्म हट्टानें त्याच्या नसानसांतून भिनून राहतातच. पुरुषाला स्त्रीच्या सौंदर्याचा अनिवार मोह असतो, ही इतर प्राणिमात्रांच्यावर त्यानें मात केली असें पाहिजे तर म्हणा. पण अगदीं संस्कारी, पोक्त, प्रौढ पुरुष घेतला तरी त्याला स्त्रियांच्यांतले शारीरिक सौंदर्य व बौद्धिक सौंदर्य यांचें मिश्रण जास्त विलोभनीय वाटतें. पुरुषाच्या अंगांत थोड्याफार प्रमाणांत खेळाडू वृत्ति असतेच; त्यामुळें दुसरी खेळकर सोबतीण भेटतांच त्याचा दिल तिच्याशीं जमून जातो. या खेळाडू वृत्तीमुळेंच दुसरीवर चढाई करण्याची जेवढी त्याला हौस असते तेवढीच दुसरीनें त्याच्यावर हल्ला करावा अशी त्याला इच्छा असते. पहिलवान जसा दुबळ्या लेकांच्या वाटेला जात नाहीं, तसाच तो त्यांना मित्र म्हणून कधीं जवळहि करीत नाहीं. तुल्यबल, मग तें बुद्धीचें असो, शरीराचें असो, शौर्याचें असो अगर युक्तीचें असो, हें मैत्रीचें अधिष्ठान आहे; हा सामर्थ्याचा समान धर्म म्हणजे स्नेहाचा अभंग दुवा आहे. पुरुष हा नावीन्याचा चाहता आणि

उन्मादक वैचित्र्याचा भोक्ता आहे. त्याला बौद्धिक सौंदर्य थोडेंफार स्तिमित करतें खरें, पण त्याच्या आकांक्षा शेवटीं शरीरसौंदर्यावरच लुब्ध होतात. स्त्रीविषयीं पुरुषाच्या अशा प्रवृत्ति असतांना जी स्त्री त्याच्या या प्रवृत्तीची युक्तीनें जोपासना करील तिच्या तो स्वाधीन होतो. मग ती लग्नाची बायको असो कीं लग्नाबाहेरची मैत्रीण असो. पुरुष फारच विवेकी असला, परिस्थितीचा त्याच्या-भोंवतीं गुदमरून टाकण्याइतका दाब असला, तो दारिद्र्याच्या अगर ध्येयाच्या फिकिरींत चूर झालेला असला, तर तो कशाहि पत्नीशीं संसारयात्रा निमूटपणें रेटीतच असतो; पण पुरुषाचे म्हणून जे गुणधर्म आहेत ते तृप्त न झाल्यानें तो सद्वर्तनी पुरुषहि आंतून कष्टी असतो. पुरुषांनीं बहकून जाऊं नये, बहक-लेल्यांनीं मागें फिरावें व समंजस पण कष्टी पुरुषांना संसारांत उल्हास वाटावा, असें वागण्याची जबाबदारी सुगृहिणींच्यावर येऊन पडते.

आणि आमच्या सुगृहिणी पाहाव्यात तर त्या नवऱ्याच्या भावनांबद्दल निखालस बेफिकीर असतात. नवऱ्यानें आपल्यावर प्रेम करणें हें मुलें होण्या-इतकेंच सृष्टिकर्माधीन आहे, प्रेमाची आणि संततीची समृद्धि ही कालाधीन आहे, असें मानणाऱ्या स्त्रिया कांहीं कमी नाहींत. परमार्थ, धार्मिक व्रत-वैकल्यें, कथापुराणें, यांच्या नादीं लागल्यानें जुन्या स्त्रिया अकालीं प्रौढ होतात, वैराग्याचा आव आणतात, तर शिकलेल्या स्त्रिया निवळ आळसानें उदासीन होऊन जातात. दोघीहि असा विचार क्वचितच करतात कीं, नवऱ्यास उत्ते-जनाची, उल्हासाची, हुरूपाची जरूरी असते. सर्वांत जास्त बेफिकिरी जर कुठें दाखवावयाची असेल तर ती नवऱ्याजवळ; जास्त हट्टीपणा, वितंड, करारी-पणा दाखवावयाचा असेल तर तो नवऱ्याजवळ; कारण असला तोरा दुसरा कशाला चालवून घेईल! आमच्या स्त्रियांना अजून संसारशास्त्र माहीतच नाहीं असें वाटतें. मुलेंबाळें होणें ही कांहीं संसाराची सीमा नाहीं आणि संसार-सुखाचें तें गमक तर नाहींच नाहीं. तेव्हां चार मुलेंबाळें झालीं म्हणजे इति-कर्तव्यता साधली अशी कोणी समजूत करून घेऊं नये. किती स्त्रियांना आपल्या पुरुषांची मर्जी संपादन करतां येते? फारच थोड्यांना; हें उत्तर दरेक पुरुषाच्या अंतःकरणांत घुटमळत असलेलें आढळून येईल. याचें कारण म्हणजे पुरुषाच्या ज्या प्रवृत्ति आहेत त्या प्रवृत्तींची मोजदादच स्त्रिया कधीं घेत नाहींत हें होय.

पुरुष हा सौंदर्याचा भुकेला असतो, पण नीटनेटकें वागून त्याच्या भावना कधीं त्याची पत्नी संभाळते का ? घरांत वावरतांनाहि बाहेर जाण्याइतकाच टापटिपीचा पोशाक कितीजणी करतात ? घरांत उंची वस्त्रें नेसावींत असें माझें म्हणणें नाहीं. साधेंच पण नीटनेटकें अंगाबरोबर नेसणें नेसलें तरी ते शरीराचा आकर्षक उठाव दाखवितेंच. रोजच्या वागण्यांतहि अगदीं अशी टापटीप आणि मोहकता ठेवतां येईल कीं, लग्नाच्या पहिल्या कांहीं दिवसांत दिसणारी आकर्ष-कता पुरुषाला जन्मभर दाखवून खेळवितां येईल. लाडिक वागणूक तिऱ्हा-इतांशीं करणें हजार वेळां गर्हणीयच; परंतु नवऱ्याशीं लाडिकपणा करणें, लटका विनय दाखविणें, हें क्षम्यच नव्हे तर अत्यंत आवश्यक आहे. बायको म्हणजे अदबीनें देरेक आज्ञा ऐकणारा ऑफिसांतला गडी नसावा अगर चिडखोर उपरी अंमलदारहि नसावा, अशी प्रत्येक पुरुषाची इच्छा असते. पत्नीकडे तो मित्र म्हणून सलोख्याच्या नात्यानें, विश्रामस्थान म्हणून खेळकर वृत्तीनें पाहतो. त्याला आपल्या पत्नीनें सुंदर दिसावें, आकर्षक दिसावें, लाडिक असावें, थोडक्यांत म्हणजे मोहक दिसावें व असावें असें वाटत असतें. तशीच ती मित्राप्रमाणें खेळकर वृत्तीची असावी असेंहि वाटतें. तिनें थट्टा करावी, मस्करी करून नवऱ्यावर मात करावी, उलट थट्टेनें लटका रुसवा आणावा व शेवटीं अपजय पत्करून नवऱ्यावर जय मिळवावा, अशी त्याची तिच्याबद्दलची अपेक्षा असते. या दृष्टीनें किती जणी वागतात बरें ? प्रत्येकीस सुंदर होणें जरी शक्य नसलें तरी सुंदर दिसणें शक्य आहे. नैसर्गिक न्यूनें नवऱ्याच्या मनांतून विसरून गेलेलीं असतात. इतरांच्या डोळ्यांना दिसणार नाहीं असें सौंदर्याचें गुपित अगदीं कुरूप स्त्रीचा नवराहि अंतःकरणांत सदैव जतन करीत असतो. आपलेपणाची भावना व भावनांची समरसता, या अदृष्ट पावडरीनें रंगविलेलीं पति-पत्नी म्हणूनच एकमेकांस सुंदर दिसतात, आवडूं लागतात. पण हें सौंदर्य जास्त दिखाऊ असावें, पुरुषाच्या आकर्षणाचें योग्य स्थान व्हावें, त्यालाहि त्यांतली खुमारी पाहून कृतकृत्य वाटावें, अशा पुष्कळ गोष्टी स्त्रिया मनांत आणतील तर करूं शकतील, मात्र त्या या गोष्टीबद्दल बेफिकीर असतात.

या सौंदर्यसाधनाच्या आवेशांत स्त्रियांनीं विनय सोडावा असें मात्र नव्हे. उलट जों जों विनय जास्त तों तों पुरुषाचें कुतूहल वाढत जातें असा नियम आहे.

स्त्री हें एक सृष्टींतलें गूढ आहे, तें जाणावें अशी पुरुषाची महत्त्वाकांक्षा असते. ही महत्त्वाकांक्षा विनयाच्या पडद्यानें अतृप्त ठेवून जेवढी वाढवितां येईल तेवढी पुरुषाची स्त्रीबद्दलची आसक्ति वाढत जाते. कुतूहल पूर्ण झालें तर त्याला तेव्हांच तिचा तिट्कारा येतो. तेव्हां विनयाची केवढी किंमत आहे तें चतुर गृहिणी समजतील. हा विनय अगदीं बारीकसारीक गोष्टीपासून दाखवावा लागतो. जुन्या स्त्रियांचे कांहीं कांहीं विनयाचे नियम अगदीं या वृत्तीला चांगले पोषक असतात. स्त्रियांनीं नवऱ्याच्या देखत तोंड धुणें, अंग धुणें, वेणीफणी करणें, उभें लावून वावरणें, चोळी नसतांना येणें, हीं वर्ज्य समजत. हे नियम अवश्य पाळण्यासारखे आहेत. पुरुषांच्या सौंदर्योपासक दृष्टीला नट्टयापट्टयाखालीं झाकून ठेवलेलें बेरूप ओझरतें जरी दिसलें तरी त्याला तिचा तिटकारा येईल. आदर्श सौंदर्याचा फोलपणा त्याला दिसेल व तो उदास होईल. शरीरसौंदर्याप्रमाणें प्रत्येक स्त्रीनें बौद्धिक सौंदर्यसाधन अवश्य केलें पाहिजे. विनोद, हास्य हीं अगदीं आल्हाद देणारीं अंगें घेतलीं तरी सात्त्विक व उदार विचारांनींच बुद्धीला खरें सौंदर्य चढतें. पत्नीचे विचार उच्च असले तर पुरुषाला तो एक मोठा आधार वाटतो, तो तिचा पूजक बनतो. जो विचाराचा मोठेपणा त्याला विद्येनेंहि साध्य झालेला नसतो, तो आपल्या पत्नीच्या ठिकाणीं उमजत असलेला पाहून पुरुष स्त्रीहृदयाच्या पावित्र्याची तारीफ करतो; संकटाच्या अगर अडचणीच्या वेळीं त्याचा कौल मागतो. याच्या उलट क्षुद्र विचाराच्या स्त्रीजवळ पुरुष आपलें मनहि बोलून दाखविण्यास तयार नसतो. त्याच्या विश्वासाचें निवासस्थान होण्याची जर लायकी असेल तर शुद्ध आणि विचारी पत्नीचीच होय. तेव्हां हें बौद्धिक सौंदर्यहि स्त्रियांनीं संपादन केलें पाहिजे. संसार हें एक शास्त्र आहे, तो नेटका करण्यास कांहीं नियम पाळावे लागतात, बरेच कष्टहि सोसावे लागतात.

ज्याला घरीं चमचमीत पोटभर खायला मिळत नाहीं तो हॉटेलांत जातो. आणि हॉटेलांत पोटभर मिळण्याइतकें साधन नसतें म्हणून चमचमीत खाण्याच्या लालचीनें जन्मभर तो हॉटेलांत जात असतो. ज्याची पत्नी त्याच्या भावनांची जोपासना करीत नाहीं, तो नवरा घराबाहेर पडून सुखाचीं साधनें शोधूं लागतो. हॉटेलांतील पदार्थांत स्वच्छता, सात्त्विकता कोठून असणार? पण चमचमीतपणा भरपूर असतो. तेव्हां पुरुष घर सोडून बाहेर पडला म्हणजे त्याला दुसरी दृष्टि

राहत नाहीं. नावीन्याच्या शोधांतून वैचित्र्याची आवड तात्काळ उत्पन्न होते आणि ज्याला एकदां वैचित्र्याचें व्यसन जडलें त्याचें तें सुटणेंहि कठीण! तेव्हां हा प्रश्न उपेक्षणीय नाहीं.

पण बहकलेला पुरुष ताळ्यावर कधींच येणार नाहीं असें मानूं नये. त्याला मार्गावर आणावयास वेळ लागतो; व त्याचे उपायहि थोडे निराळे आहेत. चोरून खाणाऱ्या सुनेला पोटभर जेवूं घातलें म्हणजे चोरून खाण्याची तिची खोड जाते. तसेंच बहकलेल्या पुरुषांस जरूर ती सवलत व सोय घरांत मिळूं लागली तर त्याचें व्यसन खात्रीनें सुटेल. तो ज्या कारणांनीं बहकला असेल तीं कारणें चतुर पत्नीनें शोधून काढावींत, व भरून काढावींत. कोणास खेळकर वृत्तीची पत्नी आवडत असेल, कोणास निलाजरी आवडत असेल, तर कोणास मितभाषणी आवडत असेल. पण या त्या पुरुषाच्या आवडीनिवडी जर संभाळल्या गेल्या तर तो घरांत पुनः राहूं लागेल. आजहि अशा पुरुषाची बायको कांहीं उपाय करून पाहतच असते; परंतु दुःखानें असें म्हणावें लागतें कीं, तिची उपाययोजना सर्वथैव चुकीची असते. नवऱ्यास त्याच्या मैत्रिणी-वरून घालून पाडून वेळीं-अवेळीं बोलण्यानें तो जास्तच चिडतो. पुरुष हा आपला गुन्हा आपल्या आप्तस्वकीयांपासून, मुलांबाळांपासून, शेजाऱ्यापाजाऱ्यां-पासून लपवून ठेवण्याची पराकाष्ठा करीत असतो, पण चिडून बेफाम होऊन गेलेली त्याची बायकोच जर त्या सर्वांना त्याचें पाप सांगत सुटली, त्याचा सर्वांच्या देखत पाणउतारा करूं लागली, तर पुरुषहि वैतागून जातो, निर्लज्जहि बनतो. वरपांगी त्यानें बायकोच्या डोक्यांत लाकूड फेकून मारलें नाहीं, तरी तिच्या जळफळाटानें त्याच्या मनास एकेक अढी अधिकाधिक पडत जाते. अशा भावनाशून्य, आपल्या अब्रूवर उठलेल्या, स्त्रीवर विश्वास टाकूं नये, असा तो मनाशीं निश्चय करतो आणि पतिपत्नींतील वितुष्टाचें मान सारखें वाढत जातें. तेव्हां बहकलेल्यांना ताळ्यावर आणावयाचें असेल, तर त्यांना त्यांच्या गुन्ह्याची ओळखसुद्धां देऊं नये. त्यांचा पूर्वीइतकाच आदर ठेवावा. अशा पुरुषाच्या पत्नीनें त्याच्या विश्वासाचें स्थान होऊन राहण्याचें चुकूं देऊं नये. त्याच्या अपराधाबद्दल आपण होऊन बोलूंच नये. त्यानें आपण होऊन बोलणें काढलेंच तरी उलट सहानुभूतीच दाखवावी. गुन्हेगार हा पश्चात्तापानें सारखा पोळत असतो. सहानुभूतीचा वारा, अंगाचा भडका विझविण्याकरितां,

उद्धाराकरितां, त्याला पाहिजे असतो. त्या सहानुभूतीनेंच तो चुकलेला मार्ग टाकून देतो. पत्नीच्या मनाचा मोठेपणा पाहून अगदीं पाप्यालाहि आपला अपराध कबूल करून क्षमा मागण्याची इच्छा होईल. पण ते केव्हां ? तर तसें करण्यांत त्याच्या नवरेपणास, पुरुषपणास कमीपणा येणार नसेल तेव्हां ! तेव्हां अशांच्या स्त्रियांनींहि हवालदिल न होतां त्यांना मार्गावर आणण्याचा प्रयत्न सतत ठेवावा. मात्र प्रयत्नाप्रमाणें उपायहि उचित आणि अचूक असावेत, एवढेंच.

पुरुषाच्या भावनांची ओळख नसणारी व त्यांची जोपासना न करणारीच त्याला खरी बिघडविते. घरचीनें त्याला लेटलें, तो दारचीकडे गेला तर त्यांत दोष घरचीचा ! आपला दाम खोटा: परक्याशीं झगडा काय उपयोगाचा !!

समाप्त